# मानव, जीवन

# आणि

# परलोक

लेखक
मुहम्मद जैनुल आबिदीन मन्सुरी
डॉ. मुहम्मद अहमद
डॉ. सय्यद शाहिद अली

अनुवादक
सय्यद जाकिर अली

# दोन शब्द

मृत्यू ही एक अशी वास्तविकता आहे, जी कोणीही नाकारू शकत नाही. माणूस आपल्या नातलग आणि हितेशींना मृत्यूच्या जबड्यात जाताना स्वत: पाहतो, मात्र त्यांना वाचवू शकत नाही. त्याला या गोष्टीची जाणीवसुद्धा होते की एकेदिवशी त्यालासुद्धा मृत्यू येणारच आणि नेहमीसाठी हे जग सोडून जावे लागणार!

मानवासमोर असे काही प्रश्न आहेत, ज्यांची योग्य आणि समाधानकारक उत्तरे मिळणे आवश्यक आहे. उदाहरणार्थ- जीवन काय आहे? जीवनाचा स्त्रष्टा कोण आहे? आपल्याकडून त्यास काय अभिप्रेत आहे? त्याने आपल्याला हे जीवन कशासाठी दिले? मृत्यू म्हणजे काय? मृत्यू हाच जीवनाचा अंत आहे काय? की मृत्यूनंतरही जीवन आहे? जर जीवन आहे तर यात सफल होण्याचा कोणता मार्ग आहे? अथवा या पारलौकिक जीवनात यश मिळविण्यासाठी या ऐहिक जीवनात काय करावे लागेल?

या प्रश्नांवर मोठमोठ्या विद्वान आणि विचारवंतांनी नेहमी चिंतन-मनन केले. विशेषत: या ऐहिक जीवनात येणाऱ्या मृत्यू आणि मृत्यूनंतरच्या जीवनासंबंधी काही धर्मशास्त्रांतसुद्धा विभिन्न प्रकारच्या विचारसरणी आढळतात, त्या खालीलप्रमाणे होय-

१) हेच (आपण जगत असलेले सध्याचे) जीवन मूळ व अंतिम असून 'मृत्यू' जीवनाचा अंत होय. मृत्यूनंतर कोणत्याही प्रकारचे जीवन नाही. म्हणून हेच जीवन मनुष्याने सफल आणि यशस्वी करावे, प्रत्येक भौतिक आणि भावनिक इच्छा पूर्ण करावी व जीवनात सर्वांगी आणि परिपूर्ण समाधान प्राप्त करावे. जीवनातील प्रत्येक मौज पूर्ण करावी. कोणत्याही बाबतीत इच्छा अपूर्ण ठेवता कामा नये. कारण ही संधी नंतर मिळणार नाही. अर्थातच जीवनाचा उद्देश केवळ ऐशोआराम, भोगविलास आणि चंगळवाद होय.

२) काही लोकांना वाटते की मृत्यूनंतरसुद्धा जीवन असून यास पारलौकिक जीवन म्हणतात. स्वर्ग आणि नरकसुद्धा एक वास्तविकता आहे. पारलौकिक (मृत्यूपश्चात) जीवनात स्वर्गप्राप्तीसाठी मनुष्याने अशी श्रद्धा ठेवावी की समस्त मानवजात ही जन्मजात गुन्हेगार आणि पापी आहे. मात्र मानवजातीच्या पापाचे प्रायश्चित्त स्वत: ईश्वरपुत्राने सुळावर आपल्या प्राणाचा बळी देऊन केले आणि तिला पापातून कायमचे मुक्त केले. म्हणून या ईश्वरपुत्रावर श्रद्धा ठेवावी, तर निश्चितच स्वर्गप्राप्ती होईल.

३) आणखीन काही इतरजनांना असे वाटते की मृत्यू म्हणजे जीवनाचा अंत नव्हे! मनुष्य या ऐहिक जीवनातील चांगल्या आणि वाईट कर्मांचे अथवा पुण्य आणि पापाचे फळ भोगण्यासाठी वारंवार या सृष्टीत जन्म घेतो. तो कधी कृमी कीटक तर कधी पशु-पक्षी, कधी

झाडे-झुडपे आणि कधी तो ८४ लक्ष योनींतून भ्रमण केल्यानंतर मनुष्ययोनीत जन्म घेतो आणि मुक्ती प्राप्त करतो.

४) यानंतर एक विचारसरणी अथवा सिद्धांत असादेखील आहे की हे ऐहिक जीवन प्रत्येक मनुष्यासाठी परीक्षागृह असून त्याचे जीवन एक परीक्षा आहे. मनुष्य आणि ही सृष्टी तसेच सृष्टीतील प्रत्येक सजीव व निर्जीव, चल-अचल, एव्हाना प्रत्येक वस्तूचा स्रष्टा आणि निर्माता एकच व अद्वितीय आहे. त्याच एकमेव आणि अद्वितीय स्रष्टा व निर्मात्या ईश्वराने मानवास बुद्धी आणि विवेकसामर्थ्य दिले, जेणेकरून त्याने जीवनाच्या अस्तित्व आणि सार्थकतेसंबंधी पूर्ण बुद्धी व विवेकसामर्थ्याने मृत्यूपश्चात-जीवनासंबंधी विचार करूनच हे ऐहिक जीवन व्यतीत करावे. ज्याने ईश्वरास एकमेव स्वामी, प्रभु, पालनकर्ता, स्रष्टा स्वीकारून ईशमार्गावर आपले जीवन व्यतीत केले, तो मृत्यूनंतर स्वर्गात प्रवेश करील आणि हेच मात्र त्याच्यासाठी सर्वांत मोठी परम सफलता आणि महान यश असेल. याउलट ज्याने ईश्वरास नाकारले, त्याने दाखविलेल्या मार्गावर जीवनाची वाटचाल न करता त्याच्या उलट जीवनप्रवास केला, तर ही विपरित वाट सरळ नरकात जाते. अर्थातच ईशअवज्ञेचे फळ म्हणून त्यास कधीही न संपणाऱ्या यातनामय नरकाग्नीत जावे लागेल. हे मात्र त्याच्याकरिता सर्वांत मोठे दुर्भाग्य आणि अपयश व अपमान असेल. मनुष्याला या ऐहिक जीवनातील प्रत्येक पाप-पुण्य, चांगल्या-वाईट कर्मांचा प्रभु व सर्वोच्च न्यायाधीश ईश्वरासमोर जाब द्यावा लागेल.

उपरोक्त चारही प्रकारच्या विचारधारा परस्परविरूद्ध असून एकाच वेळी चारही विचारधारा किंवा धारणा खऱ्या असणे शक्यच नाही. मात्र या चारपैकी एक विचारसरणी सत्याच्या खूप जवळ असल्याचे स्पष्ट दिसून येते. ती कोणती धारणा आहे? हे जाणून घेऊन तिचा स्वीकार करणे आवश्यक ठरेल आणि हे प्रत्येक मानवाचे कर्तव्यच होय.

मृत्यूनंतरच्या जीवनासंबंधी या पुस्तकात काही लेख एकत्रित करून त्या माध्यमाने सत्याचा शोध घेणे शक्य होईल. या सृष्टीत मानवास केवळ एकदाच जीवन मिळते, हे मात्र त्रिकाल सत्य आहे. म्हणून मृत्यूपश्चात जीवन अगर पारलौकिक जीवनासंबंधी आपल्याला खूप गांभीर्याने व विवेकबुद्धीचा वापर करून निर्णय घ्यावा लागणार आहे. कारण आज निर्णय घेताना घडणारी अगदी छोटीशी चूक उद्या भयानक परिणाम भोगायला लावणारी आहे. कारण हीच चूक उद्या भयानक नरकाग्नी व ईशप्रकोपाच्या स्वरूपात समोर येणार आहे.

मृत्यूनंतरचे जीवन स्वत: डोळ्यांनी पाहिल्याशिवाय त्यावर विश्वास ठेवायचा नाही, अशाप्रकारची मानसिकता असलेले लोक केवळ इतकेच सांगू शकतात की 'आम्हाला अजिबात हे माहीत नाही की मृत्यूपश्चात जीवन आहे की नाही!' मात्र तो छातीठोकपणे असे मुळीच सांगू शकत नाही, 'आम्हाला माहीत आहे की मृत्यूपश्चात जीवनच नाही.' मात्र

हेदेखील विसरता कामा नये की एखादी वास्तविकता अगर सत्य जाणून घेण्यासाठी केवळ 'डोळ्यांनी पाहणे' हाच एकमेव मार्ग नाही. आजपर्यंत मेल्यावर कोणीही जीवंत होऊन परत येऊन सांगितले नाही की मृत्यूनंतर जीवनच नाही. स्वर्ग-नरक असण्याची धारणा सपशेल खोटी आहे. मी स्वत: आपल्या डोळ्यांनी पाहिले आहे की तेथे काहीही नाही. जीवनाच्या या अत्यंत महत्त्वपूर्ण विषयासंबंधी अशी बिकट परिस्थिती असताना कोणत्या मार्गाने सत्यापर्यंत पोचता येईल आणि ही समस्या कायमची सुटेल, याचा शोध घेणे आवश्यक आहे.

मृत्यूपश्चात जीवनासंबंधी स्वत: आपल्या डोळ्यांनी पाहिलेल्या अपयशानंतर वास्तविकतेपर्यंत पोचण्याचा दुसरा मार्गसुद्धा आहे आणि तो म्हणजे आपला जन्म, जीवन आणि सृष्टी (ब्रह्मांड) मधील संकेत व पुराव्यांना पाहून विवेकशक्तीचा वापर करून सत्य व असत्यासंबंधी आपली भूमिका ठरवावी आणि योग्य तो निर्णय घ्यावा.

वेद, पुराण, बायबल वगैरे ग्रंथांत स्पष्टपणे मृत्यूपश्चात जीवन, स्वर्ग-नरक आणि महाप्रलयानंतर समस्त मृत्यू पावलेल्या लोकांनी जीवित होऊन स्वर्ग आणि नरकाची वास्तविकता स्वत: आपल्या डोळ्यांनी पाहण्याचे यथार्थ सत्य मांडण्यात आले आहे. आजपासून साडेचौदाशे वर्षांपूर्वी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर कुरआन अवतरित झाला होता. हा अंतिम ईशग्रंथ आहे. यामध्ये समस्त मानवजातीकरिता आदर्श मार्गदर्शन, आदेश-निर्देश उपलब्ध आहेत. यानंतर मानवाच्या मार्गदर्शनासाठी कोणताही ग्रंथ येणार नाही. आपल्या डोळ्यांनी मानवाने या अत्यंत महत्त्वपूर्ण वास्तविकतेचे दर्शन प्राप्त करावे म्हणून पवित्र कुरआनने या सृष्टीमध्ये फैलावलेल्या निसर्गाच्या संकेत आणि प्रमाणांवर चिंतन-मनन करण्याचे आव्हान करून त्यानुसार निर्णय घेण्याची सूचना दिली आहे. याबरोबरच चुकीचा निर्णय घेतल्यामुळे होणाऱ्या नुकसानाची चेतावणीसुद्धा दिली आहे. हेच कारण आहे की चिंतन-मनन करण्याची विवेकबुद्धी व सामर्थ्य ईश्वराने केवळ मानवालाच प्रदान केले आहे. मानवासाठी ही अत्यंत नाजुक परीक्षेची घडी आहे. याच क्षणी मानव आपल्या बुद्धी, विवेक व कौशल्य आणि योग्यतेद्वारे आपल्या अमानुष गरजा पूर्ण करतो. उदाहरणार्थ : खाण-पान, जीवनातील इतर व्यावहारिक गरजा व मौलिक विषय तसेच त्यांच्या परिणामांविषयी चिंतन-मनन करून योग्य निर्णयापर्यंत पोचतो.

पुढील लेखांचा अभ्यास करणाऱ्या वाचकांना माझी कळकळीची विनंती आहे की त्यांनी प्रथम आपले मन, अंत:करण शुद्ध करावे; मनातून जुनाट पारंपरिक विचार काढून टाकावेत, कोणत्याही प्रकारच्या ईर्ष्या, द्वेष आणि तिरस्काराच्या भावनेस थारा न देता अगदी निष्पक्ष होऊन चिंतन-मनन करावे. असा अवश्य विचार करावा की मृत्यूनंतर सदोदित आणि कधीही नष्ट न होणारे जीवन असून स्वर्ग आणि नरकाचे अस्तित्व हे सत्य असून यावर अवश्य विचार करावा की मृत्यूपश्चात जीवन, स्वर्ग-नरक सर्व काही सत्य आहे आणि मी

जर पारलौकिक जीवन नाकारून हे इहलोकी जीवन व्यतीत केले तर माझे काय होईल?

पुढील लेखांचा अभ्यास केल्यानंतर वाचक जर त्यांच्याशी सहमत झाले तर मृत्यूपश्चात जीवन आणि कर्मांच्या ईश्वरासमक्ष उत्तदायित्वाची धारणा स्वीकार करण्यात कोणतीही बाब अडसर ठरता कामा नये. कारण कोणतेही यथार्थ नाकारल्यास वास्तविकता बदलत नसते आणि याचा परिणाम अत्यंत भयानक स्वरूपात समोर येणारच.

एक निराकार, सर्वशक्तिमान, सर्वव्यापी अल्लाहचा स्वीकार करून पारलौकिक जीवनात त्याच्यासमोर आपल्या पाप-पुण्य आणि कर्मांचा जाब देण्यावर दृढविश्वास आणि धारणा ठेवताच माणसाने वैयक्तिक आणि सामूहिक जीवनात या धारणा आणि श्रद्धांचे क्रियात्मक व व्यवहारात्मक दर्शन घडविणे आवश्यक आहे. आपण आपल्या व्यावहारिक जीवनात ईशमर्जीनुसार व ईशआदेशानुसार कर्म जर करणार नाही आणि कोणत्याही प्रकारच्या सत्य-असत्य, न्याय-अन्यायाची तमा न बाळगता स्वैर जीवन जगलो तर या श्रद्धा आणि धारणेचा काहीही उपयोग होणार नाही. सर्व काही व्यर्थ आहे. विशेषत: ईश्वराने आपला संदेश आणि संपूर्ण जीवनासाठी मार्गदर्शन ज्या ईशदूत अर्थात प्रेषितांवर आणि अंतिम प्रेषित आदरणीय मुहम्मद (स.) यांच्यावर आणि अवतरित कुरआनवर श्रद्धा ठेवणेसुद्धा आवश्यक आहे.

मला आशा आहे की वाचकगणांस पुस्तकाच्या अध्ययनामुळे जीवनाच्या या मूळ आणि महत्त्वपूर्ण सत्याला समजण्यासाठी तसेच त्यासंबंधी योग्य निर्णय घेण्यासंबंधी पूर्ण मदत मिळेल.

आपला विश्वासू

**मुहम्मद इकबाल मुल्ला**
सचिव, जमाअते इस्लामी हिंद
नवी दिल्ली - ११००२५

# या जीवनानंतर काय?

## - मुहम्मद जैनुल आबिदीन मन्सुरी

आपला देश एक धर्मप्रधान देश आहे. येथे प्राचीन काळापासूनच धर्माचे अस्तित्व विविध स्वरूपात पाहायला मिळते. दुसऱ्या शब्दांत- धार्मिकता या समाजाचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. याच वैशिष्ट्यामुळे येथील सामान्य जनता अत्यंत प्रभावित आहे. अशाप्रकारे ही स्वयंसिद्ध वास्तविकता आहे की धार्मिक मूल्यांची मानव-जीवनास नेहमीपासूनच आवश्यकता राहिलेली आहे. मात्र याबरोबरच हे तथ्यदेखील मुळीच विसरता कामा नये की समाजामध्ये केवळ धार्मिक मानसिकता आणि धार्मिक विचारसरणी असणे पुरेसे ठरत नसून त्याच्या मौलिकतेचा प्रश्नच प्रमुख महत्त्वाचा असतो. धार्मिक मूल्ये जेवढी मौलिक असतील तेवढाच त्यांचा प्रभावदेखील जास्त असेल आणि यामुळे मानवाच्या नैतिकता, स्वभाव आणि चारित्र्यात उत्तम सुधारणा घडून येईल.

भारतीय समाजात विविध प्रकारच्या गंभीर समस्यांचे काहूर येत गेले. आज या समस्यांत सतत वाढच होत आहे, नव्हे समस्यांचे अक्षरश : वादळ उठत आहे. याचे मुख्य कारण मौलिक धार्मिक मूल्यांचा ऱ्हास, गळचेपी आणि मुस्कटदाबी, त्याचप्रमाणे भौतिकवादी संस्कृतीचे उघड आक्रमण होय. काही अतिस्वार्थी आणि आत्मकेंद्री लोकांनी आपल्या घृणित उद्दिष्टांची पूर्तता करण्यासाठी सामान्य जनतेत विभिन्न प्रकारच्या कृत्रिम समस्या व अडचणी निर्माण करून मानवजातीस भयानक संकटात टाकले. सामान्य जनतेच्या मानसिकतेत त्यांनी स्वैराचार, दुष्कर्म, वामकृत्य आणि स्वच्छंदता यासारख्या बिनवेसनी भावनांचे विष कालविले. या विषाचा प्रभाव बेशरमाच्या झाडाप्रमाणे बिनधास्त फोफावत आहे. या विषारी परिणामाचा प्रभावसुद्धा अत्यंत भयानक व उग्र स्वरूपाच आहे. ईश्वराप्रति निष्ठा, भक्ती, श्रद्धा आणि ईशपरायणतेच्या भावना कोमेजून, करपून जात आहेत. आणखीन एक विलक्षण परिस्थिती पाहावयास मिळते. माणूस आतून मात्र विभिन्न संकीर्णतांमुळे फोल आणि पोकळ होत असून वरवर मात्र ईश्वराप्रति निष्ठा आणि भक्तीचा मुलामा चढविण्यात येत आहे. माणूस हा माणूस राहिला नसून भौतिकतेचे एक चालते-फिरते यंत्रच झाले आहे. त्याची सर्व धावपळ ही आपल्या स्वैर इच्छांची पूर्तता आणि भौतिकवाद व चंगळवादापर्यंत मर्यादित होऊन बसल्या. चांगला असो की वाईट, पाप असो की पुण्य, तो कोणत्याही मार्गाचा अवलंब करून जीवनातील भोगवस्तू प्राप्त करण्यासाठी पिसाट लांडग्याप्रमाणे सैरावैरा धावतच सुटला आहे. त्याला मृत्यू आणि मृत्यूनंतरच्या जीवनाची साधी आठवणसुद्धा होत नाही. त्याला कधी या गोष्टीची जाणीवच होत नाही की त्यास आपल्या भल्या-बुऱ्या कर्मांचा आपल्या पालनकर्त्या व निर्मात्या ईश्वरासमोर जाब द्यावा लागणार आहे. एक पाळीव कुत्रासुद्धा आपल्या मालकाच्या आदेशाचे पालन न केल्यास मालकाच्या साध्या

नाराजीला घाबरतो. मात्र माणसाची अवस्था त्याच्यापेक्षाही बिकट झालेली आहे. यदाकदाचित काही ठिकाणी परलोकाची कल्पना आढळत असलीच तर ती अवास्तव, कृत्रिम आणि वास्तविकतेचा आधार नसलेली असल्याने प्रभावी ठरत नाही.

## पारलौकिक जीवन नाकारण्याचे दुष्परिणाम

मृत्यूपश्चात जीवन नाकारल्याने अनेक प्रकारचे चारित्र्यिक आणि नैतिक दुष्परिणाम मानवाच्या मानसिकतेवर पडतात. त्याचे व्यक्तिमत्त्व संकुचित आणि विकृत होते. तो मानवी मूल्य, मर्यादा आणि नैतिकता बिनधास्तपणे पायदळी तुडवित असतो. म्हणूनच सामान्यत: चांगल्या आचरण आणि पुण्यकर्माचा त्याला विसर पडतो. तो सर्वत्र फक्त आपलेच हित पाहत असतो. त्याचे प्रत्येक काम त्याच्या वैयक्तिक लाभ-हानीवरच केंद्रित होत असते. आपला फायदा असेल तरच एखाद्या कामात हात घालायचा, अन्यथा तिकडे ढुंकूनही पाहायचे नाही, अशा मानसिकतेतच तो वावरत असतो. आपल्या दोन पैशांच्या फायद्यासाठी पाप, व्यभिचार, भ्रष्टाचार, खून-दरोडे, रक्तपात आणि यासारख्या कोणत्याही कामात त्याला मुळीच संकोच वाटत नाही. अशाप्रकारे दुर्गुण आणि स्वैराचारामुळे निर्माण झालेल्या समस्या आणि विकारांच्या जुलमी विळख्यात पूर्ण समाजच अडकून जातो. वर्तमान समाजाची हीच दुर्गत आपल्यासमोर आहे. आज बहुसंख्य लोक आपल्या कर्मांप्रति दायित्वहीन, बेजबाबदार, निर्धास्त आणि निश्चिंत झालेले आहेत. मानवाला या वस्तुस्थितीचा गंधही नाही की या जीवनानंतर येणाऱ्या जीवनात त्याला आपल्या एकन् एक कर्माचा जाब जगाचा निर्माता व सर्वशक्तिमान ईश्वरास द्यावा लागणार आहे. कर्म चांगले असतील तर त्यास स्वर्गप्राप्तीच्या स्वरूपात पुरस्कार मिळेल आणि या जगातून वाईट आचरण व अपराधी कर्मांचे गाठोडे सोबत घेऊन गेला तर नरकाग्नीची शिक्षा मिळेल! पारलौकिक जीवनाची मौलिक धारणा माणसाला केवळ मार्गदर्शनच करीत नसून उत्तम चारित्र्य आणि नैतिक आचरण निर्माण करण्याबरोबरच माणसात सृष्टीनिर्मितीचा उद्देश, वास्तविक न्याय आणि ईश्वराच्या तत्त्वदर्शितेचे यथोचित परिणाम व प्रभाव निर्माण करते.

ज्याअर्थी माणूस आपल्या निर्मात्याप्रतिच प्रामाणिक आणि कृतज्ञ नसेल, तर त्याच्याप्रति आपल्या कर्मांच्या बाबतीत उत्तरदायित्व अगर जबाबदाऱ्यांच्या बाबतीत दक्ष कसा राहणार! परिणामी तो चांगुलपणा, उत्तम आचरण व नैतिक चारित्र्य तसेच परोपकार आणि कल्याणकारी कर्मांपासून दूर राहील आणि तो जे काही करील, अथवा कोणतेही काम करील तर त्यापासून इतरांना नुकसानच होईल. एवढेच नव्हे तर त्याच्या स्वत:करितासुद्धा हानिकारक, दु:खद आणि वाईट भोग ठरतील. अर्थात माणसाचे वैयक्तिक आणि सामाजिक जीवनच व्यर्थ ठरेल!

## मानव-जीवनातील विकास

पारलौकिक जीवनाच्या खऱ्या, मौलिक, वास्तविक आणि सशक्त धारणेच्या अभावामुळे मानवाचे जीवन असंख्य समस्या आणि विकारांनी ग्रस्त होते. माणसाच्या मनात जर अशी भावनाच नसेल की आपल्या भल्या-बुऱ्या कर्मांचा सर्वशक्तिमान आणि सर्वोच्च न्यायाधीश असलेल्या ईश्वरा (अल्लाह) समोर हिशेब द्यावा लागणार आहे, तर त्याच्या आचारविचार आणि कर्मांमध्ये ईशपरायणता व ईशभय मुळीच आढळणार नाही. तो स्वैर आणि स्वच्छंद होऊन वाटेल तसे वागतो, मनात येईल ते करतो, वैध-अवैध, उचित-अनुचित, नैतिक-अनैतिक वगैरेंसारख्या बाबींना आपल्या आचरणात व मनात थारासुद्धा देत नाही. तो नि:संकोचपणे इतरांच्या जिवांशी खेळतो, इतरांच्या शीलत्वाचे वस्त्रहरण करतो, नैतिकतेची भररस्त्यात नग्न धिंड काढतो, आपले कोण काय वाकडे करणार अशा तंद्रीत मानवी मूल्ये निष्ठूरपणे पायदळी तुडवितो.

ईशपरायणता, परलोकवाद आणि आपल्या कर्मफळाविषयी जबाबदारीची धारणा नसलेल्यास मुळात सत्य-असत्य आणि न्याय-अन्यायात फरकच समजत नाही. तो बेजबाबदारपणे बिनधास्त वागत असतो. आपल्या शक्ती आणि सामर्थ्याचा वापर अन्याय-अत्याचार आणि हिंसा करण्याचा सर्रास वापर करतो. दुसऱ्यांच्या संपत्तीवर डल्ला मारणे, लूटमार करणे, लोकांचे नाहक रक्त सांडणे, स्त्रिया आणि मुलींवर बळजबरी करणे, त्यांच्या शीलत्वाची राखरांगोळी करणे, नवजात मुलींना ठार करणे, कचाट्यात येईल त्यावर अत्याचार करणे, हा त्याचा कायदाच असतो. दारू पिणे, अश्लील वर्तन करणे, नग्नतेचा व शीलत्वाचा बाजार मांडणे, या बाजारातून आडमाप कमाई करणे, लोकांना सळो की पळो करून सोडणे, भ्रष्टाचार आणि लाचलुचपतीच्या माध्यमाने इतरांचे खिसे कापणे, लोकांच्या शारीरिक आणि मानसिक क्षमता कुंठीत करणे, त्यांच्या मान-सन्मानाचा आपल्या अहंकाराच्या क्रूर देवतेसमोर बळी देऊन तिला प्रसन्न करणे आणि त्यांच्याप्रति अन्याय व अत्याचारपूर्ण व्यवहार न करणे; अशा असंख्य व्याधी आणि विकार माणसात व समाजात निर्माण होतात.

अगदी एकच असलेल्या मानवसमाजात एक वर्ग स्वत:ला उच्च तर इतरांना कनिष्ठ घोषित करीत असतो. इतरांना दलित, दमित होऊन राहण्यास भाग पाडतो, त्या दलितवर्गास आजीवन गुलामीचे भोग भोगण्यासाठी सोडून देतो. या जातीय, उच्च-नीच व स्पृश्यास्पृश्यतेच्या अनयायपूर्ण आगीत निर्दयीपणे होरपळणाऱ्या कनिष्ठ समाजाचा केविलवाणा टाहो ऐकून त्याचे पाषाणहृदय तळमळत नाही. तो अत्यंत निष्ठूरपणे इतरांचे विव्हळणे, टाहो फोडणे ऐकून आपल्या तथाकथित स्वामित्वाचा तोरा मिरवित असतो; लोक दयेची भीक मागत असतात, मात्र हा निष्ठूर आणि निर्दयी खुशालपणे मिशांवर ताव देत असतो. अशाप्रकारे मानवता आक्रोश करीत असते, आपल्या या केविलवाण्या अवस्थेवर आणि दुर्गतीवर शोकग्रस्त होऊन पाषाणावर डोके फोडीत असते. अशाप्रकारे मानवसमाजात सर्वत्र

रक्त ओकणारे वातावरण निर्माण होते. हिंसा, उपद्रव, अत्याचार, अनाचार आणि अन्यायाचे नग्न तांडव मानवतेच्या उरावर सुरूच असते. आणखीन विलक्षण बाब अशी की हे सर्वकाही इथेच थांबत नाही, तर हे उचित सिद्ध करण्यासाठी नियती व पूर्वकर्मांचे प्रायश्‍चित्त अगर भोग असल्याचे बिनधास्त सांगून आक्षेप व विरोधाचे निवारण करण्यात येते. अर्थात हा पूर्ण दहशतवाद धर्माच्याच नावावर चालू असतो. या अमानुष व अन्यायपूर्ण छळ आणि शोषणास धर्म आणि नियतीचे नाव देऊन अन्याय व अत्याचारपीडितांच्या मुसक्या बांधून त्यांना कायमचे गुलाम करण्यात येते.

## परलोकावरील श्रद्धेचे फायदे

याउलट परलोकावर धारणा ठेवल्याने मानवाचे चारित्र्य अलंकृत होते. त्याचे प्रत्येक कर्म हे पुण्याच्या मार्गावर असते. इतरांच्या अधिकारांचा तो ताबा घेत नाही, इतरांचे अधिकार पायदळी तुडवित नाही, इतरांवर अन्याय-अत्याचार करीत नाही. त्याचे प्रत्येक काम इतरांना त्रास देणारे नसते. त्याला सर्वांचे हित आणि कल्याणाची इच्छा असते. तो इतरांकरिताही तेच पसंत करतो, जे स्वत:करिता पसंत करतो. तो वर्तमान जीवनात भौतिक सुख-समाधानाच्या मागे पिसाळलेल्या कुत्र्यासारखा धावत नाही. त्याची दृष्टी संकुचित न राहता व्यापक बनते. परिणामी तो क्षणिक आणि केवळ स्वत:चेच फायदे न पाहता, येथील ऐहिक जीवनाच्या लाभांना सर्वकाही न समजता मृत्यूनंतरचे जीवन आणि त्यातील स्थायिक व कायमस्वरूपी सुखशांती, आनंद व यश प्राप्त करण्यासाठी प्रयत्नशील असतो. यासाठी तो चांगले व भले कर्म करतो. अन्याय, अत्याचार, अनाचार, अतिरेक आाणि अश्‍लीलतेपासून स्वत:ला दूर ठेवतो.

परलोकावर विश्‍वास आणि धारणा ठेवणाऱ्या व्यक्तीमध्ये साहस आणि उत्साह विकसित होतो. ती व्यक्ती कोणत्याही परिस्थितीचा धैर्याने सामना करते. कारण तिचा ईश्‍वरावर पूर्ण विश्‍वास असतो. पारलौकिक यश मिळविण्यासाठी आणि कायमस्वरूपी सुख-शांती व समाधान मिळविण्यासाठी कोणत्याही संकटासमोर दृढतेने उभी राहते, प्रत्येक समस्येवर अगदी सहजतेने समाधान काढते. निराशा आणि वैफल्य तिच्या जवळही फटकत नाही. वैफल्यग्रस्त होऊन ती कधीही आत्महत्या करीत नाही, इतरांचा वध करीत नाही, तर उलट धैर्याने व सत्यनिष्ठ होऊन आपल्या कर्तव्यांची पूर्तता करण्यात मग्न असते. कारण तिला विश्‍वास असतो की, या जगातील प्रत्येक गोष्ट क्षणभंगूर आहे, कारण हे जीवनच क्षणभंगूर आहे. येथील प्रत्येक प्रतिकूल परिस्थिती, समस्या व अडचणसुद्धा क्षणभंगूर आहे. याव्यतिरिक्त सत्यनिष्ठ जीवनाच्या आनंदमय, स्थायी आणि कायमस्वरूपी फळे, तसेच शाश्‍वत परिणाम तर पारलौकिक जीवनातच स्वर्गाच्या स्वरूपात मिळतील!

त्या व्यक्तीस चांगलेच ठाऊक आहे की या जगात निर्माण झालेला बिघाड दूर करून सुधारणा घडवून आणण्यावर, अशांती व अन्याय-अत्याचाराच्या ठिकाणी शांती व

न्यायाचे वातावरण निर्माण करून हे जग वाईट कर्म व विकारांपासून मुक्त करून नंदनवनाचे वातावरण निर्माण करण्यात प्रमुख भूमिका निभावण्यावरच पारलौकिक जीवनाचे यश अवलंबून आहे; दीनदुबळे, निर्धन आणि असहाय्यांच्या मदतीस धावून जाणे, कोणताही धार्मिक व जातीय भेदभाव न बाळगता दुःखित, पीडित आणि रंजल्या-गांजल्यांचे अश्रु पुसणे, यावरच पारलौकिक जीवनाचे यश अवलंबून आहे. पारलौकिक जीवनावर श्रद्धा आणि धारणा ठेवणारी व्यक्ती जगातील प्रत्येक प्रकारचे अन्याय व अत्याचारांचा समूळ नायनाट करण्यासाठी अहोरात्र झटत असते. याकरिता आवश्यकता पडल्यास आपल्या संपत्ती, सुख-शांती, भावना आणि प्राणाचादेखील बळी देते. अशाप्रकारचे सद्‌गुण, सद्‌विचार व नैतिकता असलेल्या समाजाची उभारणी होते आणि अत्यंत सहजगत्या अन्याय व अत्याचारांपासून मुक्ती मिळते. अशा समाजात एकमेकांप्रति प्रचंड स्नेह, बंधुभाव, सहानुभूती आणि कणवळा निर्माण होतो. इतरांना काटा रुतला की आपल्याला वेदना होतात. अशा समाजामध्ये परोपकार आणि साहाय्याच्या भावनेस प्राथमिकता असते. आपला शेजारी उपाशी असेल तर स्वतःला श्रद्धावंत समजू शकत नाही. या समाजातील सर्वच सदस्यांमध्ये दंभ, अहंकार, फाजील अभिमान आणि इतरांना आपल्यापेक्षा कनिष्ठ लेखण्याची मुळीच भावना नसते. श्रद्धा आणि ईशपरायणतेमुळे सर्व प्रकारचे न्यूनगंड आणि भयगंड नष्ट पावतात आणि ते अत्यंत निर्भीडपणे ईशमार्गावरच जीवनाची वाटचाल करतात. धरतीवर साक्षात स्वर्गस्वरूपाचे हे वातावरण पारलौकिक जीवनावर विश्वास ठेवल्याने तसेच स्वर्गाची कामना व नरकाग्नीतून मुक्तीच्या तीव्र इच्छेमुळे होत असते. अशाप्रकारे जगातील अज्ञान आणि अरेरावीचा अहंकार नष्ट होतो आणि माणसाला व संपूर्ण समाजालाच या इहलोकी जीवनातही खरे समाधान लाभते व पारलौकिक जीवनातसुद्धा अपार यश लाभते.

## इस्लाममध्ये परलोकी जीवनाची धारणा

इस्लाममध्ये परलोकी जीवनाची धारणा ही इस्लामच्या मूळ आधारस्तंभांपैकी एक होय. परलोकी जीवनाचा या इहलोकी जीवनाशी अत्यंत घनिष्ट संबंध आहे. मुळात परलोक याच इहलोकी जीवनाचे विकसित रूप आहे. या प्रचंड विश्वात जेवढ्या कमतरता व उणिवा आहेत, त्या परलोकी जीवनात पूर्ण करण्यात येतील. ज्या वस्तू या ठिकाणी डोळ्यांनी दिसत नाहीत, त्या परलोकी जीवनात स्पष्ट होतील. निश्चितच मानवास या इहलोकी जीवनात आपल्या चांगल्या कर्मांचे पूर्ण फळ आणि दुष्कर्माचे दंड मिळत नाही. येथे भल्या-बुऱ्या कर्मांचा प्रभावसुद्धा जीवनाबरोबरच समाप्त होत नसून बऱ्याच काळापर्यंत त्याचे चांगले-वाईट परिणाम होत असतात.

एखाद्या व्यक्तीने मानवतेस शिक्षित आणि संस्कारित केल्यास त्याचा दीर्घकाळपर्यंत परिणाम होत असतो. याचप्रमाणे कोणी जर वाईट शिकवण दिली तर त्याचा परिणामदेखील दीर्घकालीन असतो. म्हणून चांगल्या आणि वाईट कर्मांचे मूल्यांकन करण्यासाठी या

गोष्टीची निश्चितच गरज आहे की कर्मांचे सर्वच प्रभाव आणि परिणाम पाहून त्यांचे पुरावे एकत्रित करून अपराधी व पापीजनांना त्या सर्वांसमोर दंड देण्याचा आदेश द्यावा जे त्यांच्या दुष्कर्मांमुळे दु:खी आणि पीडित झालेले असतील. अशाप्रकारचा परिपूर्ण न्याय याच नश्वर व क्षणभंगूर जीवनात मिळणे पूर्णत: अशक्य आहे. म्हणूनच परिपूर्ण व नि:पक्ष न्यायासाठीसुद्धा परलोकाची नितांत गरज आहे. इस्लामची अशी धारणा आहे की मानवाचे हे इहलोकी जीवन म्हणजे त्याचा परीक्षाकाळ आहे. हे जीवन आणि हे समस्त जग नश्वर असून एकेदिवशी याचा विनाश होणे निश्चित आहे. शाश्वत जीवन हे तर मुळात परलोकी जीवनच आहे. जर मानव एकेश्वरत्व, प्रेषितत्व, परलोकी जीवन वगैरे मौलिक धारणांवर विश्वास ठेवून जीवनात ईशआदेशांचे पालन करीत असेल, तर त्याच्यासाठी परलोकी जीवनात निश्चितच चांगले फळ असून त्यास स्वर्गप्राप्ती होईल, तेथे त्याला शाश्वत जीवन मिळेल. हे जीवन सुख-शांती आणि समाधानाने परिपूर्ण असेल. याउलट वाईट कर्म करणाऱ्यास नरकाच्या असह्य यातनांचे भोग भोगावे लागतील. अर्थातच माणूस जसे कर्म करील, तसे फळ भोगावे लागणार. परलोकी जीवनात अंतिम निवाड्याच्या दिवशी या इहलोकी जीवनाप्रमाणे आपल्या कर्मांवर पडदा टाकू शकणार नाही. त्याने जे काही भले-बुरे केले, ते त्याच्यासमोर स्पष्टपणे सादर करण्यात येईल. त्या दिवशी मानवाचे डोळे, नाक, कान, हात, पाय आणि शरीराचा प्रत्येक अवयव त्याच्या कर्माची साक्ष देईल. ईशन्यायालयात अपराधी स्वत:हून आपापल्या अपराध आणि दुष्कर्मांचा स्वीकार करतील व त्यावर खूप पश्चात्ताप करतील. आपल्या अपराधी कर्मांचे हे अत्यंत वाईट फलित पाहून त्यांना वाटेल की एकदा परत इहलोकी जाण्याची संधी मिळावी, जेणेकरून चांगली कर्मे करून अर्थातच ईशआदेशांनुसार जीवन व्यतीत करून या परलोकी जीवनात यश प्राप्त करावे, नरकाग्नीच्या अत्यंत भयानक यातनांपासून मुक्ती मिळवावी आणि अत्यंत विलोभणीय तसेच समस्त इच्छापूर्तीचे ठिकाण असलेल्या स्वर्गात प्रवेश मिळवावा. मात्र त्यास अशी संधी मुळीच मिळणार नाही. कारण परीक्षाकाळ सदासाठी संपलेला असेल. अशा कठीण प्रसंगी म्हणजेच पारलौकिक जीवनातील या ईशन्यायालयात त्याला कोणीही मदत करू शकणार नाही. कोणतेही नातेसंबंध व मैत्री या ठिकाणी कामी पडणार नाही. एवढेच नव्हे तर जगामध्ये ज्यांना ईश्वर समजून भजण्यात आले व पूजण्यात आले होते, तेसुद्धा कोणत्याही प्रकारची मदत करणार नाहीत. प्रत्येकास केवळ स्वत:चीच चिंता लागलेली असेल.

ईशन्यायालयात प्रत्येक मानवासंबंधी जो निर्णय होईल, तो अत्यंत न्यायानुकूल असेल. कोणावरही तसूभरही अन्याय होणार नाही. त्या प्रसंगी कोणीही आपल्या अधिकारापासून वंचित होणार नाही. कोणाचाही अधिकार हिरावण्यात येणार नाही. प्रत्येकास आपापल्या कर्मानुसार फळ मिळेल. ज्याच्या चांगल्या कर्माचे पारडे वाईट कर्मांपेक्षा भारी असेल, तो यशस्वी होईल आणि त्यास मोक्ष मिळून स्वर्गप्राप्ती होईल. याउलट ज्याची वाईट कर्मे

चांगल्या कर्माच्या तुलनेत जास्त असतील, त्यास नरकाग्नीत यातना भोगाव्या लागतील.

मानव आपले नुकसान आणि अहित कधीही इच्छित नाही. ईश्वराचा आज्ञाधारक होऊन जगावे, त्याच्या प्रत्येक आदेशाचे पालन करावे, त्याने दाखविलेल्या मार्गानुसारच जीवनाची वाटचाल करावी, हे खरे तर माणसाच्या स्वभावातच आहे. मात्र ज्या वेळी तो आपल्या या निसर्गदत्त स्वभावास आपल्या स्वैर अभिलाषा, कुत्सित स्वार्थ आणि बाह्य प्रभावांच्या दावणीला बांधतो, तेव्हा तो स्वत:च्या पायावर स्वत:च कुऱ्हाड मारून घेतो. त्याच्या जीवनातून मौलिक गुण, नैतिक व धार्मिक मूल्ये आणि सदाचार व आचरणमर्यादा निघून जातात. परिणामी तऱ्हेतऱ्हेच्या दुष्कर्म, पाप आणि विकृतींच्या भयानक विळख्यात तो जखडला जातो.

आज मानवसमाजात ज्या विकृती, अशांती व असमाधानांचे जे वादळ उठलेले आहे त्याचे मूळ कारण ईशपरायणता आणि परलोकी जीवनाविषयी खऱ्या धारणांप्रति बेसावधपणा व कोणत्याही प्रकारची चिंता न बाळगणेच होय. म्हणून आपण आपले जीवन सार्थक करण्यासाठी धर्माच्या मौलिक धारणा स्वीकारू या, लोक-परलोकात भरघोस यश, सन्मान आणि प्रतिष्ठा तसेच सुख-शांती, समृद्धीचे वातावरण निर्माण करू या; आपले, आपला समाज व देशाचे नवनिर्माण करू या आणि मानवतेची प्रतिष्ठा व गौरव जपू या!

# कर्म, पुनर्जीवन आणि इस्लाम

**- डॉ. मुहम्मद अहमद**

आजकाल टी.व्ही., वृत्तपत्र वगैरेंसारख्या प्रसारमाध्यमांत अशा आशयाच्या बऱ्याच गोष्टी समोर येत असतात की अमुक मुलगा वा मुलगीस अगर विविध वयाच्या अमुक स्त्री वा पुरुषांना आपल्या पूर्वजन्मातील घटना आणि वृत्तान्त चांगल्या रितीने माहीत आहेत. एका. टी.व्ही. चॅनेलने भविष्यात घडणाऱ्या परिणामांना धाब्यावर बसवून व्यावसायिक स्वार्थाने भारावून पूर्वजन्म आणि मृत्यूपरांत जन्मापर्यंतच्या घडामोडींसंबंधी माहिती असण्याचा दावा करून आपल्या दर्शकांची संख्या वाढविली. असा दावासुद्धा करण्यात आला की अमुक व्यक्तीने अमुक व्यक्तीच्या स्वरूपात पुन्हा जन्म घेतला. तसेच या आधारावर असेसुद्धा घडले की पुनर्जन्म झालेल्या व्यक्तीने संपत्तीवर वारसाहक्कानुसार ताबा मिळवण्याचा प्रयत्न केला. हे 'आयोजन' मुळात स्वप्रचाराचे माध्यम तर झालेच, शिवाय ही अवधारणा जीवनाच या क्रांती व उत्थानामध्ये एक जबरदस्त अडसर आणि समस्या निर्माण करून गेली. असादेखील प्रचार करण्यात येतो की अमुक व्यक्तीची दुरवस्था ही मुळात त्याच्या मागील जन्माचे भोग आहेत, म्हणून तिने हे भोग भोगायलाच हवेत. खरे पाहता वेदांमध्ये तरी जन्म-जन्मांतरवाद आणि अवागमनीय पुनर्जन्माचा उल्लेख आढळत नाही. मुळात या धारणेचा प्रवेश हिंदू-धर्म दर्शनामध्ये परावर्तीत होणाऱ्या युगात झालेला आहे. महापंडित

'राहुल सांकृत्यायन' यांनी या धारणेच्या सत्य असत्यावर प्रश्नचिन्ह लावून लिहिले आहे की अशा पुनर्जन्मावर आधारित धारणेचे अस्तित्व हे मुळात सामाजिक अन्याय आणि अत्याचारांवर पडदा टाकण्याचा कुटील डाव आहे. यासंबंधी त्यांनी स्पष्टपणे लिहिले आहे, ''या (इह)लोकात पुनर्जन्म होणे ही तर पीडितवर्गासाठी खूपच भयानक विचारधारा आहे. यामध्ये आजच्या दु:खांना विसरणेच नसून यासह हेदेखील सांगितले गेले आहे की येथील सामाजिक विषमता ही त्यांच्या मागील जन्माच्या तपस्यांच्या (दु:ख, पीडा, अन्याय व अत्याचारपूर्ण वेदना) परिणामस्वरुपी होय. या विषमता सोसल्याशिवाय तुम्ही आपल्या आजच्या त्रासदींचे पारितोषिक प्राप्त करू शकत नाही.'' *(संदर्भ : 'दर्शन-दिग्दर्शन'-किताबमहल, दिल्ली. आवृत्ती- इ.स. १९९१, पृष्ठ क्र. ४०३)*

ख्यातनाम संत स्वामी पद्मनजी आणि स्वामी महेश्वरानंदजी यांच्यासारख्या ख्यातनाम पंडितांनी ८४ लाख योनींमध्ये कर्मानुसार होणारे परिभ्रमण हे मिथ्या आणि थोतांड ठरविले आणि याविषयी स्पष्ट शब्दांत लिहिले आहे, याला कोणत्याही प्रकारचा तार्किक आधार आणि उत्तर उपलब्ध नाही. सुविख्यात अभ्यासक 'डॉ. एम. एन. रॉय' यांनी स्पष्टपणे अशी भूमिका मांडली आहे, ''पुनर्जन्माच्या सिद्धांतामुळे समाजात नियतीवाद जन्म घेतो आणि यामुळे माणूस निष्क्रिय, पौरुषहीन आणि षंढ होतो.'' *(संदर्भ 'इंडियन मेसेज्', पृष्ठ क्र. १४,१५१)*

पंडित मंगलदेव (तडित्कान्त) वेदालंकार यांनी 'यम और पितर' (हिंदी) या पुस्तकात प्रचलित पुनर्जन्माच्या श्रद्धेचे खंडन केले. त्याचप्रमाणे डॉ. राधाकृष्णन, सत्यकाम विद्यालंकार वगैरेंसारख्या विद्वानांनीसुद्धा ही पुनर्जन्मावरील धारणा विवेक आणि बुद्धीच्या कसोटीवर पारखून पाहिली आणि यात कोणत्याही प्रकारचे तथ्य नसल्याचा निर्वाळा दिला. पुनर्जन्माचा दावा करणाऱ्या अनेक प्रकरणांची पडताळणी करणारे अमेरिकेचे वरिष्ठ अभ्यासक व संशोधक 'डॉ. आईन स्टीवन्सन' (वर्जीनिया विद्यापीठ) यांनी लिहिलेल्या 'चिल्ड्रेन हू रिमेंबर प्रिव्हियस लाइव्हज्' या सुप्रसिद्ध पुस्तकात म्हटले आहे, ''आत्मा आणि अवागमनीय पुनर्जन्मासंबंधी कोणतीही गोष्ट तर्क, बुद्धी आणि विवेकाच्या कसोटीवर खरी सिद्ध होत नाही.''

## पुनर्जन्मावरील श्रद्धेची बौद्धिक पडताळणी

आपल्या भारतात बऱ्याच अभ्यासक आणि विद्वानांनी काही कथित पुनर्जन्मित गोष्टींच्या आधारावर सूक्ष्म अभ्यास व अध्ययन केले. रॉयबहादूर शाम सुंदरलाल, के. के. एन. सहाय, ताराचंद माथुर, डॉ. एम. सी. बोस, लाल देशबंधु गुप्ता, प्रा. आज्ञेय, डॉ. केदार, डॉ. किर्तीस्वरूप रावत, डॉ. एल. पी. मेहरोत्रा, पंडित नेकीराम शर्मा वगैरे विद्वान आणि अभ्यासकांनी या विषयावर लिहिले आहे. मात्र त्यातील स्पष्टीकरणावरून उभे राहणाऱ्या प्रश्नांमुळेच यावरील तथ्य अडचणीत सापडते.

आत्मा आणि अवागमनीय पुनर्जन्माची ही मान्यता इस्लाम, ख्रिस्ती धर्म, बौद्ध आणि इतरही अशा धर्मांत अथवा संप्रदायांत आढळत नाही. हे केवळ हिंदू धर्मात आणि काही यासारख्या इतर संप्रदायांतच असून सामान्यांना विवशतेच्या जोखंडात आवळून ठेवण्यासाठी याचा बऱ्याच काळापासून उपयोग करण्यात येत आहे. मात्र या ठिकाणी ही वस्तुस्थितीदेखील विसरून चालणार नाही की अशाप्रकारचे प्रयत्न सपशेल अपयशी ठरलेले आहेत. या पुनर्जन्माची धारणा अगर श्रद्धा विज्ञानाच्या कसोटीवर पडताळून पाहण्याकरिता इ.स. १९६५ च्या जवळपास राजस्थान विद्यापीठात 'परामनोविज्ञान' विभागाची स्थापना करण्यात आली. वरिष्ठ परामानसशास्त्रज्ञ डॉ. एच. एन. बॅनर्जी यांच्या अध्यक्षतेखाली हा विभाग सुरू करण्यात आला होता.

डॉ. बॅनर्जी हे अत्यंत प्रतिभाशाली आणि सत्यनिष्ठ अनुसंधानाचे प्रबळ समर्थक होते. परामानसशास्त्रज्ञांतर्फे वारंवार उल्लेख करण्यात येणाऱ्या शंभरपेक्षाही अधिक पुनर्जन्मासंबंधीच्या प्रकरणांची त्यांनी जातीने लक्ष घालून पडताळणी केली. संशोधनासाठी त्यांनी स्थापित केलेल्या पडताळणी गटांनी प्रत्यक्ष घटनास्थळी जाऊन संशोधनकार्य पूर्ण केले. बऱ्याच स्थळांवर बॅनर्जी स्वत:देखील गेले. एका मोठ्या टीमसह बॅनर्जी तुर्कस्थानात गेले. या गटात वरिष्ठ डॉक्टर्स आणि मानसशास्त्रज्ञसुद्धा होते. जबरदस्त तयारीनिशी या वरिष्ठांचा गट तुर्कस्थानी रवाना झाला होता. तेथील अडाना जिल्ह्यात कथित पुनर्जन्माच्या घटनेचा जबरदस्त प्रचार होत होता. काही लोक याला मजबूत प्रकरण असल्याचे समजत होते. मात्र प्रचार व प्रसारमाध्यमांनी ज्या प्रकरणाचा व ज्या गावाचा बोभाटा केला होता, ते प्रकरण तर सोडाच, ते गावदेखील बॅनर्जींना तुर्कस्थानात आढळले नाही.

डॉ. बॅनर्जींनी अहोरात्र प्रयत्न केले, मात्र सगळे प्रयत्न निष्फळ ठरले. त्यांनी या घटनेचा उल्लेख सपशेलरित्या आपल्या शोधकार्यात केला. त्यांनी शंभरपेक्षा अधिक पुनर्जन्म प्रकरणांची जी पडताळणी केली, त्यातून हाच निष्कर्ष समोर आला की अवागमनीय पुनर्जन्माचा शोधबुद्धी आणि विवेकाशी कोणताही संबंध नसून त्यास कोणत्याही प्रकारचा तार्किक आधार नाही. त्या शंभरपेक्षाही अधिक प्रकरणांपैकी एकही प्रकरण खरे सिद्ध झाले नाही. पुनर्जन्माच्या समर्थकांनी बॅनर्जी यांच्याविरूद्ध टीकेची झोड उडविली. त्यांना पदावरून काढून टाकण्यात आले आणि कोण जाणे कशासाठी इ. स. १९६८ साली हा विभागच बंद करण्यात आला. हा विभाग बंद करण्याचे रहस्य मात्र कोणालाही समजू शकले नाही.

## वैज्ञानिक आधाराचा अभाव

पुनर्जन्माला अद्यापही पुरावा सापडलेला नाही. त्याला मुळीच कोणताही वैज्ञनिक आधार प्राप्त झालेला नाही आणि याचे एकमेव कारण एवढेच आहे की पुनर्जन्माचा वास्तविकतेशी कोणताही संबंध नाही. दि. ७ ऑक्टोबर १९६८ रोजी प्रकाशित झालेल्या एका बातमीनुसार, ''मानसशास्त्रज्ञांनी काही प्रकरणांची पडताळणी केल्यावर अशी भूमिका मांडली की आपल्या पूर्वजन्मातील गोष्टी सांगणारे लोक अधिकांश 'साइकिक हिस्टेरिया' नामक रोगाने ग्रस्त असतात. या रोगाने पछाडलेले लोकच अशाप्रकारच्या गप्पा मारीत असतात. जयपूर येथील मानसिक चिकित्सालयाचे डॉ. बी. के. व्यास आणि आणखीन एक विशेषज्ञ रतन सिंह यांचा असा दावा आहे की त्यांनी अशा प्रकरणांवर उपचार केले आणि पूर्वजन्माच्या आठवणी सांगण्याचा मानसिक विकार जडलेल्यांवर यशस्वी उपचार करण्यात त्यांना पूर्णपणे यश मिळाले. डॉ. व्यास यांनी 'युनायटेड न्यूज ऑफ इंडिया (यूएनआय)'ला दिलेल्या मुलाखतीत स्पष्टपणे सांगितले की, ''पुनर्जन्मातील आठवणी सांगणाऱ्या लोकांचे मानसिक संतुलन बरोबर नसते. अधिकांश वैयक्तिक समस्यांनी ग्रस्त असलेल्यांना हा विकार जडतो. मानसिक असंतुलनामुळे लोकांना आपल्याकडे आकर्षिण्यासाठी आणि त्यांच्यात आपले महत्त्व वाढविण्यासाठी ते अशाप्रकारच्या चित्र-विचित्र व विलक्षण असलेल्या पूर्वजन्माच्या दंतकथा लोकांना सांगून इतरही काही फायदे करून घेत असतात.'' (संदर्भ : हिंदुस्थान टाइम्स, नवी दिल्ली) डॉ. व्यास यांनी या प्रकरणी आपली सत्यनिष्ठ भूमिका मांडताना काही प्रकरणांचा लेखाजोखासुद्धा दिला आहे.

देशात पुनर्जन्माचा दावा करणाऱ्या ज्या काही घटना समोर आल्या आहेत, त्याचे मूळ कारण एकतर मानसिक रोगाने ग्रस्त झालेल्यांनी सांगितलेल्या घटना आहेत किंवा एखाद्या लाभापोटी अगर असाधारण फायदा मिळविण्यासाठी एखादी काल्पनिक घटना तयार करून मांडण्यात आलेली आहे. अशाच एका काल्पनिक घटनेसंबंधी डॉ. ए. पी. मेहरोत्रा यांनी लिहिले आहे, ''ही घटना एका अशा मुलासंबंधी आहे, ज्याच्या बहिणीस पूर्वजन्मातील घटना आठवत होत्या. त्याच्या बहिणीच्या पूर्वजन्मातील घटना या मुलामध्ये प्रकट झाल्या आणि मजेशीर बाब अशी की तो स्वत:ला महात्मा गांधींचा अवतार अथवा महात्मा असल्याचा दावा करू लागला. या मुलाने महात्मा गांधींविषयी पुस्तक वाचले आणि या आधारावर तो त्यांच्याविषयी कथा सांगू लागला. लोकांना जेव्हा कळले की महात्मा गांधींचा पुनर्जन्म झाला तेव्हा मोठ्या संख्येत लोक त्यास भेटायला येऊ लागले. कॉंग्रेसचे बडे नेतेसुद्धा त्याला भेटण्यास येऊ लागले. एवढेच नव्हे तर स्वत: सुशीला नायर यासुद्धा त्याला भेटण्यासाठी गेल्या होत्या. लोकांची अक्षरश: रीघ लागली आणि म्हणता-म्हणता या मुलास प्रचंड प्रसिद्धी मिळाली. मात्र लवकरच त्याचे बिंग फुटले आणि त्याचा खोटारडेपणा समोर आला.''

## न्यायालयाचा ऐतिहासिक निर्णय

'आत्म्याचे पुनर्जन्म आणि जन्म-जन्मांतरवाद' यावर प्रतिष्ठित लेखिका सोमा सबलोक यांनी इ.स. १९७८ मध्ये 'आत्मा आणि पुनर्जन्म' या विषयावर लेख लिहिला, या लेखात त्यांनी अवागमनीय पुनर्जन्म हे तर्क आणि विज्ञानाच्या कसोटीवर पडताळून सपशेल खोटे असल्याचे सिद्ध केले होते.

याचिकाकर्त्याने दिल्लीच्या तीसहजारी न्यायालयात म्हटले होते की उपरोक्त लेखामुळे एका विशिष्ट धर्माच्या आस्थेवर प्रहार असून यामुळे जनतेच्या भावना दुखावल्या जात आहेत. न्यायालयाने या प्रकरणाच्या विविध पैलूंची पडताळणी करून दि. २ डिसेंबर १९८३ रोजी ही याचिका फेटाळताना आपल्या निर्वाळ्यात म्हटले, "या ज्ञान-विज्ञानाच्या काळामध्ये आत्म्याचे अस्तित्व आणि पुनर्जन्माच्या सिद्धान्तावर शंका आणि आक्षेप घेण्याचा प्रत्येकालाच अधिकार आहे. कारण असे करणे म्हणजे शास्त्रीय आणि सुधारणावादी विचारसरणी निर्माण करण्याच्या दिशेत पाऊल उचलणे होय, ज्याकरिता भारतीय दंडविधान ५१(अ) मध्ये निर्देश देण्यात आले आहेत. याच उद्देशानुसार लेखिकेने या लेखाद्वारे वाचकांना ज्ञानी बनविण्याचा प्रयत्न केला, लोकांना ज्ञानप्रकाश देऊन योग्य जीवनमार्ग दिला. ही मोठीच दुर्दैवाची बाब आहे की अशाप्रकारच्या लिखाणामुळे सदरील लेखिकेवर हिंदूंच्या धार्मिक भावना दुखावण्याचा आरोप लावण्यात आला असून तिला कित्येक वर्षांपर्यंत न्यायालयाच्या पायऱ्या झिजवून न केलेल्या चुकीची शिक्षा भोगावी लागली. सदरील लेख सत्य शोधण्याच्या दिशेतील एक प्रयत्न असून याविषयी असे मुळीच म्हणता येणार नाही की या लेखाच्या आधारे जाणूनबुजून हिंदूंच्या धार्मिक भावना दुखविण्यात आल्या आहेत. ख्रिस्ती धर्म, इस्लाम, बौद्ध व यांसारख्या बऱ्याच धर्मांत आत्मा आणि पुनर्जन्मावर विश्‍वास ठेवण्यात आलेला नाही.

अर्थातच जन्म-जन्मांतरवाद आणि अवागमनीय पुनर्जन्माच्या समर्थनार्थ कोणत्याही प्रकारच्या बौद्धिक, वैज्ञानिक आणि व्यावहारिक तथ्यांचा आधार नाही. यावरून या धारणेवर काही सहज प्रश्‍न उभे राहतात ते आपण पाहू या!

**प्रश्‍न १** - माणसाच्या चांगल्या आणि वाईट कर्मांनुसार त्यास पुरस्कार आणि दंड मिळणे आवश्यकच आहे. मात्र चांगल्या कर्मांचा पुरस्कार आणि वाईट कर्मांचा दंड अथवा शिक्षा कोण्या जीव-जंतूत आणि पशु-पक्षी वा किड्यामुंग्यांत रुपांतरित होऊन मिळणे शक्यच नाही. मग या प्रचलित धारणा अथवा मान्यतेमध्ये हे समजणे शक्य नाही की त्यास कोणत्या पुण्यकर्माच्या पुरस्कारापोटी कोणाचा जन्म मिळतो आणि कोणत्या पापाची शिक्षा भोगण्यासाठी कोणता जन्म मिळतो? म्हणूनच स्वाभाविकरित्या असे वाटणे साहजिकच आहे की माणसाला मिळणारे पुनर्जन्म हे अवागमनीय स्वरूपाचे नसावे आणि कोणत्या कर्माचे कोणते फळ आहे, हे निश्‍चितपणे समजावे. इस्लामच्या पारलौकिक धारणेमध्ये असे

प्रावधान आहे.

**प्रश्न २** - खरा न्याय मिळण्याकरिता पारलौकिक जीवन अनिवार्य आहे.

**प्रश्न ३** - अवागमनीय पुनर्जन्माच्या धारणेनुसार पशु-पक्षी, कृमी-कीटक, वनस्पती इत्यादी हे पापकर्मांचे परिणाम जर असतील तर मग याचा अर्थ असा झाला की मानवजीवनाकरिता लाभदायक असलेल्या या वस्तू मिळविण्याकरिता जास्त पापकर्मे करण्यात यावी?

**प्रश्न ४** - मानवाच्या पापकर्मांचे प्रभाव त्याच्या मृत्यूनंतरसुद्धा पडतात. म्हणून बुद्धी आणि विवेकास हेसुद्धा अपेक्षित आहे की त्याच्या पाप-पुण्याचे भावी पिढ्यांवर पडणाऱ्या चांगल्या आणि वाईट कर्मांचे आकलन आणि मूल्यांकन व्हावे आणि मग त्यास शिक्षा देण्यात यावी, जेणेकरून भावी पिढीस हे लक्षात येईल की आपल्या पूर्वजांनी कोणते पाप केले आणि कशाप्रकारचा त्या पापाचा प्रभाव पडत आहे. मात्र असे होत नाही आणि ते शक्यसुद्धा नाही.

**प्रश्न ५** - हे स्वाभाविक तथ्य आहे की जेव्हा माणसाला हे समजते की तो पूर्वजन्मातील पातककर्मांची शिक्षा भोगण्यासाठी जन्मलेला आहे, या मानसिकतेमुळे त्याचे मनुष्यत्व प्रभावित होणारच. त्याच्यात आत्मसन्मान, स्वाभिमान आणि पुरुषार्थाची भावना निर्माण होणे तर शक्यच नाही, उलट तो दु:ख, अपमान, ग्लानी, क्षोभ आणि प्रायश्चित्तासारख्या हीन भावनांनी ग्रस्त होऊनच जीवनाचे भोग भोगील. त्याचा विकास प्रभावित झाल्याशिवाय राहणार नाही.

**प्रश्न ६** - लोकांमध्ये अहंकाराची तुच्छ भावना वाढीस लागेल. संपन्न आणि सामर्थ्यशाली लोक हे निर्धन, दुर्बल आणि दीन-दलितांना हीन व तुच्छ लेखतील, त्यांच्याशी उपेक्षित व्यवहार करतील आणि परिणामी मानवता स्पृश्यास्पृश्यता, उच्च-कनिष्ठ वगैरेंमुळे दुभंगेल.

## पुनर्जीवनाची इस्लामी धारणा

इस्लाम ही मुळात एक परिपूर्ण जीवनव्यवस्था असून त्याच्या शिकवणी मानवासाठी सर्वथा कल्याणकारी आणि मोक्ष देणाऱ्या आहेत. हे एक पूर्णत: उघड सत्य आहे की मनुष्याला या जीवनात तरी त्याच्या चांगल्या आणि वाईट कर्मांचा बदला पूर्णपणे मिळणे शक्य नाही. म्हणूनच याकरिता परलोकी जीवनाची धारणा असणे अनिवार्य आहे. जगाच्या पाठीवरील सर्वच मोठ्या धर्मांमध्ये पारलौकिक जीवनाची धारणा आढळते. इस्लामी परिभाषेत पारलौकिक जीवनास 'आखिरत' असे म्हटले जाते.

इस्लामची अशी धारणा आहे की मनुष्यास मिळालेले हे जीवन त्याच्या परीक्षेचा काळ आहे. हे जीवन आणि हे जग एका मर्यादित काळापर्यंतच अस्तित्वात राहणार असून एक दिवस असा येईल की या समस्त जगाचा विनाश होईल. अर्थातच हे जग आणि हे जीवन नश्वर असून शाश्वत जीवन हे मुळात पारलौकिक जीवन होय. मनुष्याचे हेच जीवन पारलौकिक जीवन यशस्वी करण्याच्या तयारीकरिता मिळालेले आहे. जर मनुष्याने हे जीवन

ईशआदेश आणि मर्जीनुसार व्यतीत केले, अर्थात एकेश्वरत्व, पैगंबरत्व, पारलौकिकवाद वगैरे मौलिक धारणा स्वीकारून सत्कर्मांच्या मार्गाने जीवन व्यतीत केले तर त्यास त्याचा स्वर्गप्रवेशाच्या स्वरूपात असलेल्या ईशप्रसन्नतेचा अत्यंत महीम व अभूतपूर्व पुरस्कार मिळेल. या ठिकाणी त्यास वास्तविक अमर जीवन, वास्तविक सुख-शांती आणि समाधान व संतुष्टता मिळेल. खऱ्या अर्थाने त्याचे हे पारलौकिक जीवन या इहलोकी जीवनाचे विकसित स्वरूप होय. कारण या ठिकाणी त्यास कोणत्याही गोष्टीची कमतरता आणि चणचण भासणार नाही. या प्रशस्त आणि आनंदमयी वातावरणात तो सदैव राहणार. त्याला कधीही मृत्यू येणार नाही. याउलट मिथ्याचारामध्ये गुरफटलेल्या दुष्कर्मी मनुष्यात नरकाग्नीच्या दाहक यातना सदैवकरिता भोगाव्या लागतील.

खरे तर इस्लामने पुनर्जन्मास नव्हे तर पुनर्जीवनास मान्यता दिली आहे. इस्लाम विविध पशु-पक्ष्यांच्या आणि कृमी-कीटक व वनस्पती वगैरेंच्या स्वरूपात वारंवार जन्म घेण्यासारख्या बुद्धीसंगत नसलेल्या धारणेस मुळीच मान्य करीत नाही. इस्लामची धारणा अशी आहे की मानवजीवनाच्या सुरुवातीपासून ते महाप्रलयापर्यंतचे सारे मनुष्य परत एकदा जीवित करण्यात येतील आणि अल्लाह (ईश्वर) प्रत्येक मनुष्याच्या कर्मांचा हिशेब घेईल. एकेका कर्माचा जाब विचारील आणि प्रत्येकास त्याच्या कर्मानुसार पुरस्कार अथवा शिक्षा देईल.

"कयामत (महाप्रलय) येणे निश्चित आहे." (दिव्य कुरआन, १५:८५)

"या दिवशी ईश्वर सर्वांनाच गोळा करील." (दिव्य कुरआन, १५:२५)

"आणि कर्मनोंद पुढे ठेवली जाईल. त्यावेळी तुम्ही पहाल की अपराधी लोक आपल्या जीवन पुस्तकातील नोंदीला भीत असतील आणि म्हणत असतील की, "आमचे दुर्दैव! हे कसले पुस्तक आहे की आमची लहान मोठी कोणतीही कृती अशी उरली नाही जी यामध्ये नोंदली गेली नाही. जे जे काही त्यांनी केले होते ते सर्व त्यांच्या पुढ्यात त्यांना आढळेल आणि तुझा पालनकर्ता कोणावर तिळमात्र अन्याय करणार नाही."

(दिव्य कुरआन, १८:४९)

"चिंता त्या दिवसाची असावी जेव्हा आम्ही (स्वयं ईश्वर) पर्वतांना (हवेत उडाल्यासारखे) चालवू आणि तुम्हाला पूर्ण पृथ्वीची पाठ उघडी दिसेल. आणि आम्ही (स्वयं ईश्वर) साऱ्या मानवांना घेऊन अशा तऱ्हेने एकत्र करू की एकही त्यातून सुटणार नाही. आणि सर्वच्या सर्व तुमच्या पालनकर्त्या ईश्वरासमोर रांगेत उभे करण्यात येतील. घ्या, पाहून घ्या! आलेत ना तुम्ही आमच्यासमोर (ईश्वरासमोर) अगदी त्याचप्रमाणे, ज्याप्रमाणे आम्ही (ईश्वराने) तुम्हास पहिल्यांदा जन्म दिला होता."

आदरणीय पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जगाचा अंत होण्याची अशा शब्दांत लक्षणे दाखविली,

"ज्ञान नष्ट करण्यात येईल आणि अज्ञान अधिक असेल. व्यभिचार बोकाळेल, दारूचे जास्त प्रमाणात सेवन करण्यात येईल. पुरुषांची संख्या स्त्रियांपेक्षा कमी होईल, इथपावेतो की एकच पुरुष पन्नास स्त्रियांत असेल."

*(हदीस : बुखारी, मुस्लिम, अहमद, तिर्मिजी)*

कुरआनात आणखीन एकेठिकाणी म्हटले आहे,

"मग एक नरसिंघ फुंकले जाईल आणि अकस्मात हे आपल्या पालनकर्त्यांच्या पुढे हजर होण्याकरिता आपापल्या कबरीतून बाहेर पडतील." (दिव्य कुरआन, ३६:५१)

"जेव्हा आकाश फाटेल, आणि जेव्हा तारे विस्कळून पडतील, आणि जेव्हा समुद्र फाडून टाकले जातील, आणि जेव्हा कबरी उघडल्या जातील. त्यावेळी प्रत्येक माणसाला त्याने पुढचे मागचे केले सवरलेले सर्व कळेल." (दिव्य कुरआन, ८२:१-५)

पुनरुज्जीवनाच्या दिवशी प्रत्येकास त्याच्या कर्मांचे पूर्ण फलित मिळेल.

"मग ज्या क्षणी नरशिंग फुंकले जाईल त्यांच्यात मग कोणतेही नाते उरणार नाही आणि ते एकमेकाला विचारणारदेखील नाहीत. त्यावेळेस ज्यांचे पारडे जड असेल तेच यश संपादन करतील आणि ज्यांचे पारडे हलके असेल तेच लोक असतील ज्यांनी आपल्या स्वत:ला तोट्यात घातले, ते नरकात सदैव राहतील. अग्नी त्यांच्या मुखाचे चामडे भक्ष करून टाकील आणि त्यांचे जबडे बाहेर निघतील." (दिव्य कुरआन, २३:१०१-१०४)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"मरणाऱ्यासोबत पूर्वी तीन गोष्टी असतात, प्रथम त्याचे परिवारजन, द्वितीय त्याची संपत्ती आणि तृतीय त्याचे कर्म. मग दोन गोष्टी त्याची साथ सोडतात आणि एकच गोष्ट सोबत राहते. अर्थातच त्याचे परिवारजन आणि संपत्ती त्याची साथ सोडते आणि सोबत फक्त कर्म राहतात." *(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

कुरआनात मानवजीवनाची वास्तविकता अशा शब्दांत रेखाटण्यात आली आहे,

"सरतेशेवटी प्रत्येकाला मृत्यू आहे आणि तुम्ही सर्वजण आपापले पुरेपूर मोबदले कयामतच्या दिवशी प्राप्त करणार आहात. यशस्वी खऱ्या अर्थी तोच आहे जो तेथे नरकाग्नीपासून वाचेल व स्वर्गामध्ये दाखल केला जाईल. उरले हे जग, तर ही केवळ एक भुरळ पाडणारी बाब आहे." (दिव्य कुरआन, ३:१८५)

"त्या दिवशी प्रत्येक व्यक्तीला तिच्या कमाईचा बदला पुरेपूर दिला जाईल व कोणावरही अत्याचार होणार नाही." (दिव्य कुरआन, ३:२५)

"तो दिवस उगवणार आहे, जेव्हा प्रत्येक सजीवाला आपल्या कृतीचे फळ उपलब्ध असल्याचे आढळेल मग त्याने पुण्य केले असो अथवा पाप. त्या दिवशी मनुष्य अशी कामना करील, की किती छान झाले असते, जर हा दिवस अद्याप त्याच्यापासून फार दूर

असता! अल्लाह तुम्हाला आपल्या स्वत:चे भय दाखवतो आणि तो आपल्या दासांचा अत्यंत हितचिंतक आहे.'' (दिव्य कुरआन, ३:३०)

''जेव्हा मालमत्ताही काही फायदा पोहचवू शकणार नाही व संततीदेखील नाही,'' (दिव्य कुरआन, २६:८८)

''आज अम्ही यांची तोंडे बंद करून टाकत आहोत, यांचे हात आम्हाला सांगतील आणि यांचे पाय ग्वाही देतील की हे जगात कोणती कमाई करीत होते.'' (दिव्य कुरआन, ३६:६५)

स्वयं अल्लाहने कुरआनात म्हटले आहे,

''पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही ठीकठीक वजन करणारे तराजू ठेवू. मग कोणत्याही व्यक्तीवर यत्किंचितदेखील अत्याचार होणार नाही. ज्याने मोहरीच्या दाण्याबरोबरदेखील काही केले सवरले असेल ते आम्ही समोर आणू आणि हिशेब लावण्यास आम्ही पुरेसे आहोत.'' (दिव्य कुरआन, २१:४७)

तो दिवस सत्कर्म करणाऱ्यांसाठी सुगम आणि दुष्कर्मींसाठी खूपच कठीण असेल. कुरआनात म्हटले आहे,

''जो मनुष्य भलेपणा घेऊन येईल त्याला त्याच्यापेक्षा अधिक चांगला मोबदला मिळेल आणि असले लोक त्या दिवसाच्या धास्तीपासून सुरक्षित राहतील, आणि जो वाईटपणा घेऊन येईल असले सर्व लोक पालथ्या तोंडी अग्नीत फेकले जातील.'' (दिव्य कुरआन, २७:८९-९०)

''कोणताही शब्द त्याच्या तोंडातून असा निघत नाही ज्याला सुरक्षित करण्यासाठी एक विद्यमान निरीक्षक (फरिश्ता) हजर नाही.'' (दिव्य कुरआन, ५०:१८)

'' तो गुप्त आणि प्रकट प्रत्येक गोष्टीचा विज्ञाता आहे, तो महान आहे आणि प्रत्येक स्थितीत उच्चतर राहणारा आहे. तुम्हापैकी कोणीही मग तो मोठ्याने बोलो अथवा हळू आणि कोणी रात्रीच्या अंध:कारात लपलेला असो अथवा दिवसाच्या प्रकाशात चालत असो त्याच्यासाठी सर्व एकसारखेच आहे.'' (दिव्य कुरआन, १३:९-१०)

''मग ज्याची कर्मनोंद त्याच्या उजव्या हातात दिली जाईल. त्याच्याकडून सौम्य हिशोब घेतला जाईल. आणि तो आपल्या माणसांकडे आनंदाने परतेल. आता उरला तो इसम ज्याची कर्मनोंद त्याच्या पाठीमागून दिली जाईल. तर तो आपल्या मृत्यूला हांक देईल आणि भडकणाऱ्या आगीत जाऊन पडेल.'' (दिव्य कुरआन, ८४:७-१२)

''खरे दिवाळखोर तर तेच होत ज्यांनी पुनरुत्थानाच्या दिवशी स्वत:ला व आपल्या कुटुंबियांना नुकसानीत टाकले. चांगले ऐकून घ्या, हीच उघड दिवाळखोरी होय.'' (दिव्य कुरआन, ३९:१५)

## जन्नत (स्वर्ग)

कुरआनात म्हटले आहे,

“उरले ते लोक ज्यांनी श्रद्धा ठेवली व सत्कृत्ये केली तर त्यांना आम्ही अशा उद्यानात दाखल करू ज्यांच्या खालून कालवे वहात असतील आणि ते तेथे सदासर्वदा राहतील. हे अल्लाहचे सत्यवचन आहे, आणि अल्लाहपेक्षा आपल्या वचनात अन्य कोण सच्चा असू शकतो?” (दिव्य कुरआन, ४:१२२)

“मग जशी नेत्रसुखाची सामग्री त्यांच्या कृत्यांच्या मोबदल्यात त्यांच्यासाठी लपवून ठेवली आहे.” (दिव्य कुरआन, ३२:१७)

पैगंबर आदरणीय मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

“कयामतच्या (अंतिम निवाड्याच्या) दिवशी ईश्वराचा दास (मनुष्य) तोपर्यंत एक पाऊलदेखील पुढे जाऊ शकणार नाही, जोपर्यंत पाच प्रश्नांची अल्लाहसमोर उत्तर देणार नाही. अर्थात- आपले जीवन कशाप्रकारे व्यतीत केले? आपले तारुण्य कोठे खर्च केले? संपत्ती कोठून कमावली? संपत्ती कोठे खर्च कली? आणि जे ज्ञान त्यास मिळाले त्यावर किती अंमलबजावणी केली?” *(हदीस : तिर्मिजी)*

आणखीन एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

“स्वर्गात असलेले लोक स्वर्गातील कृपाफळांचा आनंद घेत असतील तेव्हा सहसा त्यांच्यासाठी एक प्रकाश त्यांच्यासमोर प्रकट होईल आणि काय पाहता, तर स्वयं ईश्वर त्यांच्यासमोर प्रकट आहे! ईश्वर म्हणेल, “तुमच्यावर सलामती असो, हे स्वर्गवासीयांनो!” ईश्वर त्यांच्याकडे पाहील आणि ते ईश्वरास पाहतील. मग जेव्हा ते ईश्वराचे दर्शन करतील तर हे इतके विलोभनीय असेल की ते स्वर्गाची कृपाफळे विसरून जातील, इथपावेतो की ईश्वर परत अदृश्य होईल आणि केवळ त्याची कांतीच बाकी राहील.”

*(हदीस : इब्ने माजा)*

कुरआनमध्ये आणखीन एकेठिकाणी स्वर्गाचे मनोरम चित्र अशाप्रकारे रेखाटण्यात आले आहे,

“तथापि ते लोक ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली त्यांच्या पाहुणचारासाठी फिरदौसच्या (स्वर्गाच्या) बागा असतील.” (दिव्य कुरआन, १८:१०७)

“त्यांच्यासाठी उत्तुंग इमारती आहेत, मजल्यावर मजले चढविलेल्या, ज्यांच्या खाली कालवे वहात असतील.” (दिव्य कुरआन, ३९:२०)

“ज्यात त्यांची प्रत्येक इच्छा पूर्ण होईल, ज्यात ते सदासर्वदा राहतील.”

(दिव्य कुरआन, २५:१६)

"ईशभीरू लोक शांतीच्या स्थळी असतील. उद्यानात व झऱ्यांत, तलम रेशीम व जरतारी वस्त्रे परिधान करून समोरासमोर बसले असतील."(दिव्य कुरआन,४४:५१-५३)

"आज स्वर्गातील लोक मौज करण्यात मग्न आहेत. त्यांची जोडपी गडद छायेत आहेत. आसनावर लोड लावून." (दिव्य कुरआन, ३६:५५-५६)

"त्यांच्यासमोर सोन्याच्या थाळी आणि पेले फिरविले जातील."

(दिव्य कुरआन, ४३:७१,७६:१५)

"तेथे यांना सोन्याच्या कंकणांनी व मोत्यांनी शृंगारित केले जाईल."

(दिव्य कुरआन, ३५:३३)

"तेथे ते उच्च आसनावर तक्ये लावून बसले असतील. त्यांना ना उन्हाची उष्णता त्रास देणार ना हिवाळ्याचा गारवा." (दिव्य कुरआन, ७६:१३)

"स्वर्गाची छाया त्यांच्यावर झुकून सावली करीत असेल आणि त्याची फळे सदैव त्यांच्या आवाक्यात असतील." (दिव्य कुरआन, ७६:१४)

"आम्ही गोऱ्यापान मृगनयनी स्त्रियाशी त्यांच्या जोड्या बनवू."

(दिव्य कुरआन, ४४:५४)

"ते स्वर्गस्थ लोक हिरवे गालीचे आणि सुंदर व दुर्मिळ बिछान्यांवर तक्के लावून बसतील." (दिव्य कुरआन, ५५:७६,८८:१६)

"मद्याच्या स्त्रोतांवर पेयाचे पात्र भरून भरून त्यांच्या दरम्यान फिरविले जातील. चकाकणारे पेय जे पिणाऱ्यांसाठी स्वादिष्ट असेल. त्यांच्या शरीराला त्यापासून काही अपाय होणार नाही व त्यांची बुद्धीदेखील भ्रष्ट होणार नाही." (दिव्य कुरआन, ३७:४५-४७)

"त्यांच्या चेहऱ्यावर तुम्हाला आनंदाचे तेज जाणवेल."(दिव्य कुरआन, ८३:२४)

"तेथे कोणतीही व्यर्थ आणि खोटी गोष्ट ते ऐकणार नाहीत."

(दिव्य कुरआन, ७८:३५)

अर्थातच ते चांगल्यारितीने सदैव स्वस्थ आणि आनंदी-समाधानी असतील.

हदीससंग्रहामध्ये आहे,

"तेथे (स्वर्गात) कोणत्याही प्रकारचा रोग होणार नाही, फक्त स्वास्थ्य असेल. तेथे वृद्धत्व नसेल, फक्त (सदैव) तारुण्यच असेल. तेथे फक्त आराम असून कसलाही त्रास होणार नाही. लोकांचे चेहरे आपापल्या सत्कर्मानुसार चमकत असतील, कोणाचा ताऱ्याप्रमाणे तर कोणाचा चंद्राप्रमाणे." *(हदीस : मुस्लिम)*

स्वर्गाविषयी जे वर्णन वरील मजकुरात सादर करण्यात आले, ते साहजिकच आणि स्वभावत:च प्रत्येक सूज्ञ आणि विवेकी व्यक्तीच्या अंतर्मनात याप्रति आकर्षण निर्माण

होण्याकरिता पुरेसे आहे. म्हणूनच आपण स्वर्गप्राप्तीसाठी अतिगंभीर प्रयत्न करावयास हवे, या ऐहिक जीवनामध्ये आपल्याला जी संधी मिळालेली आहे, तिचे सोने करून घेण्यासाठी सत्कर्म करून अर्थातच ईश्वराचे (अल्लाहचे) आदेशपालन करून जीवन व्यतीत करावे आणि लोक-परलोक दोहोंत यश प्राप्त करावे.

## जहन्नम (नरक)

जहन्नम अर्थात नरकास 'दोजख'सुद्धा म्हणतात. हे दुष्कर्मी आणि पापीजनांचे अत्यंत यातनामय ठिकाण आहे. यामध्ये त्यांना सदैव यातना भोगाव्या लागतील. याचे कुरआनात अशाप्रकारे स्पष्टीकरण आले आहे,

"आपल्या कृत्यामध्ये सर्वात जास्त अपयशी आणि विफल लोक कोण आहेत? जगातील जीवनात ज्यांची सर्व धावपळ सरळमार्गापासून भ्रष्ट राहिली आणि ते समजत राहिले की ते सर्वकाही यथायोग्य करीत आहेत. हे ते लोक आहेत ज्यांनी आपल्या पालनकर्त्याची वचने मानण्यास नकार दिला आणि त्याच्या पुढे हजर होण्याचा विश्वास केला नाही. म्हणून त्यांची सर्व कृत्ये वाया गेली, पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही त्यांना काहीच वजन देणार नाही. त्यांचा मोबदला नरक आहे त्या द्रोहाच्या बदल्यात जे त्यांनी केले आणि त्या उपहासापायी जो ते माझ्या आयतींशी आणि माझ्या पैगंबरांशी करीत राहिले."

(दिव्य कुरआन, १८:१०३-१०६)

"आणि ज्यांनी मर्यादांचे उल्लंघन अंगीकारले लोकांनी इहलोकी सत्य नाकारण्याची नीती अवलंबलेली होती, त्यांना आगीची वस्त्रे असतील, त्यांच्या डोक्यावर अत्यंत खवळलेले गरम व तप्त पाणी टाकण्यात येईल आणि हे पाणी त्यांच्या पोटात जाईल आणि त्यांच्या याबरोबरच त्यांची त्वचासुद्धा गळून पडेल. त्यांना (कठोर) शिक्षा देण्यास लोखंडी गदा असतील. जेव्हा ते (या यातना पाहून) घाबरून बाहेर निघू इच्छितील, तेव्हा त्यांना परत तेथेच ढकलण्यात येईल." (दिव्य कुरआन, २२:१९-२२)

"जेव्हा जेव्हा तिची आग मंद पडू लागेल आम्ही तिला आणखीन प्रदिप्त करू."

(दिव्य कुरआन, १७:९७)

"अग्नी त्यांच्या मुखाचे चामडे भक्ष करून टाकील आणि त्यांचे जबडे बाहेर निघतील." (दिव्य कुरआन, २३:१०४)

"त्यांच्यासाठी नरकाचेच अंथरूण असेल व नरकाचेच पांघरूण असेल."

(दिव्य कुरआन, ७:४१)

"त्यांनी उकळते पाणी प्यावे व दुःखदायक शिक्षा भोगावी, सत्याच्या त्या इन्कारापायी जे ते करीत राहिले." (दिव्य कुरआन, १०:४)

"तेथे जर त्यांनी पाणी मागितले तर अशा पाण्याने त्यांचे आतिथ्य केले जाईल जे तेलावरील पापुद्र्यासारखे असेल आणि त्यांचे तोंड होरपळून टाकील."

(दिव्य कुरआन, १८-:२९)

"जक्कूमचे वृक्ष गुन्हेगारांचे खाद्य असेल, तेलाच्या उकळीप्रमाणे, पोटांत ते अशाप्रकारे उकळेल जसे उकळते पाणी उसळत असते."(दिव्य कुरआन, ४४:४३-४६)

"वस्तुतः नरक एक सापळा आहे, दूराचाऱ्यांचे ठिकाण, ज्यात ते युगानुयुगे पडून राहतील. त्यात गारवा आणि पिण्यालायक कोणत्याही पदार्थाचा आस्वाद ते घेणार नाहीत. काही मिळेल तर केवळ गरम पाणी आणि जखमांचा पू."(दिव्य कुरआन, ७८:२१-२५)

"जे तेथे ते ओरडतील, विव्हळतील, श्वास ओढतील आणि तेथेच ते सदैव राहतील." (दिव्य कुरआन, ११:१०६)

"जेव्हा त्यांना अत्यंत जखडलेल्या ठिकाणी फेकण्यात येईल आणि तेथे ते विनाशाला हाक देतील. त्यांना सांगितले जाईल की आज केवळ एका विनाशाला नव्हे तर अनेक विनाशांना हाक द्या." (दिव्य कुरआन, २५:१३-१४)

"आपल्या पालनकर्त्या प्रभूकडे परत या आणि त्याचे आज्ञाकारी व्हा, यापूर्वी की तुमच्यावर यातना टाकण्यात याव्यात. मग तुमची मदत करण्यात येणार नाही. आणि अनुसरण करा त्या सर्वोत्तम वस्तुचे जी तुमच्या ईश्वरातर्फे अवतरित झाली आहे, मात्र यापूर्वीच की तुमच्यावर अचानक यातना कोसळावी आणि तुम्हास उमजूही नये."

"एखादे वेळी असे होऊ नये की एखाद्याने नंतर म्हणावे, "खेद आहे माझ्या त्या आगळिकीवर जी मी अल्लाहच्या हुजुरात करीत राहिलो, किंबहुना मी तर उलट टिंगल करणाऱ्यांत सामील होतो." (दिव्य कुरआन, ३९:५५-५६)

# मृत्यूनंतर काय?

- डॉ. सय्यद शाहिद अली

कुरआनात म्हटले आहे,

“परंतु तुम्ही लोक ऐहिक जीवनाला प्राधान्य देता, वास्तविकपणे परलोक उत्तम आहे आणि बाकी उरणारा आहे.” (दिव्य कुरआन, ८७:१६-१७)

“लोक ऐहिक जीवनाचा केवळ दर्शनी पैलू जाणतात आणि पारलौकिक जीवनाविषयी ते स्वत:च गाफिल आहेत. यांनी कधी आपल्या स्वत:शी मनन-चिंतन केले नाही काय? अल्लाहने पृथ्वी व आकाशांना आणि त्या सर्व वस्तू ज्या त्यांच्या दरम्यान आहेत, सत्याधिष्ठित व एका ठराविक मुदतीसाठीच निर्माण केल्या आहेत. परंतु बहुतेक लोक आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा इन्कार करणारे आहेत.” (दिव्य कुरआन, ३०:७-८)

मुळात या ऐहिक जीवनात पूर्णपणे न्याय मिळणे शक्यच नाही. एकाने जर एकाचा खून केला तर एकदाच फाशीची शिक्षा होईल आणि दहाजणांचा खून केला तरी एकदाच फाशीची शिक्षा होईल. अर्थातच हा परिपूर्ण न्याय मुळीच नव्हे. कारण नऊ जणांच्या खुनाची त्यास शिक्षा मिळालीच नाही. पूर्ण न्याय होण्यासाठी खुन्याला दहावेळा जीवित करून मृत्यूदंड दिला तरच पूर्णपणे न्याय होणे शक्य आहे. याशिवाय खून झालेल्यांनादेखील जीवित करून त्याच्या डोळ्यांदेखत खुन्यास त्याच्या अपराधाची शिक्षा देणे आवश्यक आहे, जेणेकरून त्यांना समाधान होईल की आपल्याला न्याय मिळाला. मग ऐहिक जीवनात हे शक्य आहे काय?

समजा, एखाद्या माणसाने चोरी केली आणि या अपराधास्तव त्यास कैदेची शिक्षा झाली. चोराला शिक्षा तर मिळालीच मात्र यामुळे त्याच्या आईला दु:ख झाले. मग मुलाने केलेल्या अपराधाची शिक्षा आईला कशासाठी मिळावी? ते एकट्यासाठी की आई आणि मुलगा या दोहोंत भावनिक नाते असते. हे नाते संपविले तर जन्मापासून वयात येण्यापर्यंत आणि त्याचे पालनपोषण कसे करील? त्याच्या प्रत्येक गोष्टीची आपुलकीने काळजी कशी वाहणार? मग पूर्ण न्यायाकरिता या गोष्टीची निश्चितच आवश्यकता आहे की आई-मुलामध्ये असे जिव्हाळ्याचे नाते नसावे आणि मुलास होणाऱ्या शिक्षेमुळे अगर त्रासामुळे आईला त्रास न होता केवळ अपराध्यालाच शिक्षा मिळावी. मग हे शक्य आहे काय?

एक अत्यंत चांगला माणूस, ज्याच्या सत्कर्मांमुळे लाखो लोकांना फायदा होत असेल आणि एक वाईट माणूस, ज्याच्या दुष्कर्मामुळे लाखोंना नुकसान उचलावे लागत असेल, तर या क्षणभंगूर जीवनामध्ये या दोघांना त्यांच्या चांगल्या व वाईट कर्मांचे पूर्ण फलित मिळणे शक्य नाही. असे का?

प्रत्येक क्रियेची एक प्रतिक्रिया होत असते. समजा, एका व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीला झोडपून काढले आणि दुसरी व्यक्ती बेशुद्ध झाली; उपाशी व्यक्तीने जेवण केले आणि त्याची भूक मिटली; रोग्याने औषध घेतले आणि तो बरा झाला, अर्थातच क्रियेची प्रतिक्रिया उमटली. मात्र काही क्रिया अशादेखील आढळतात ज्यांची प्रतिक्रिया आढळून येत नाही. तुम्ही एखाद्या आंधळ्याला मार्ग दाखविला, रस्त्यातून काटा अथवा केळीचे सालपट बाजूला केले, स्वत: उपाशी राहून उपाश्याला भोजन दिले. अशा कामांच्या प्रतिक्रिया दिसून येत नाहीत, असे का?

या जीवनात माणसाला सुखसोयी आणि अनुग्रहे मिळाली असतील तर त्याबरोबरच माणसावर जबाबदाऱ्यासुद्धा आहेत. याव्यतिरिक्त जेवढी मोठी सुखवस्तु आणि समाधान मिळाले असेल, त्याबरोबरच दु:खसुद्धा लागलेले आहे. जेवढे मोठे कृपाफळ आणि जितक्या जास्त सुखसुविधा प्राप्त असतील तेवढेच ते गमावून बसण्याचे भय आणि दु:खही त्यासोबत तेवढ्याच जास्त प्रमाणात असते. मग असे का असावे?

सर्वच नाती अथवा संबंधांचे एक केंद्र असते. उदाहरणार्थ, डॉक्टर आणि पेशंटच्या भेटण्याचे ठिकाण हे दवाखाना, वकील आणि अशिलाचे मिटींग प्लेस कोर्ट, शिक्षक आणि विद्यार्थ्यांच्या नात्यातील केंद्रस्थान शाळा तर मग ईश्वर आणि मानव यांच्या संबंधांचे केंद्र कोणते?

माणसाला संपूर्ण सुख-समाधान आणि मिळविण्यासाठी त्याच्या समस्त इच्छा पूर्ण होणे आवश्यक आहे. भविष्य आणि वर्तमानात त्याला संरक्षण मिळण्याची आवश्यकता आहे. त्याच्या समस्त परिवारजनांना सुख-समाधान आणि संरक्षण मिळणे आवश्यक आहे. सर्वच निरोगी, सुखी, समाधानी दिसायला हवेत. सर्वांकडे संपत्ती आणि भोगवस्तू असाव्यात आणि कोणीही आजारी होता कामा नये, म्हातारे होता कामा नये. कोणतीही दुर्घटना होता कामा नये. एक मच्छरही चावता कामा नये आणि कोणीही मरता कामा नये. मात्र जगात असे कधीही घडणे शक्य नाही. मग माणसाला या जीवनात पूर्ण सुखसमाधान का मिळत नाही?

जर या जगातून मानवजात नष्टच झाली तर काय होईल? काहीही फरक पडणार नाही. सूर्योदय बरोबर होत राहणार, पाऊस बरोबर पडत राहणार आणि सर्वकाही सुरळीत चालणार! जर या जगाच्या पाठीवर मानवाचे अस्तित्व असले आणि चंद्र, तारे व सृष्टीतील इतरही सर्व वस्तू नसल्या; हवा, पाणी, वनस्पती, पशु-पक्षी, प्रकाश व इतर काहीही नसले तर काय होईल? सृष्टीची पूर्ण व्यवस्थाच कोलमडून जाईल. यावरून लक्षात येते की, सृष्टीतील या समस्त वस्तूंना लाभ पोचविणारा मनुष्य नसून या वस्तूंपासून सर्वांत जास्त लाभ उचलणारा मनुष्यच आहे. इतर सर्व वस्तु मनुष्यापासून लाभ उचलत नसून उलट लाभ पोचविणाऱ्याच आहेत. यावरून हे लक्षात येते की ही संपूर्ण सृष्टी केवळ मानवाकरिताच

असून मानव मात्र कोणासाठी व कशासाठी आहे?

एका जीवंत आणि मृत पावलेल्या व्यक्तीमध्ये फरक असतो. जीवित व्यक्ती विचार करू शकते, बोलू शकते, हालचाल करू शकते. मानसशास्त्रानुसार मानवी बुद्धीचे दोन भाग करण्यात आले आहेत. प्रथम चेतन आणि द्वितीय अचेतन. अचेतन भाग बुद्धीचे कोठार असून यात मानवाचे सर्वच विचार साठवून ठेवण्यात आलेले असतात. समजा, एखाद्या व्यक्तीची स्मरणशक्ती नष्ट झाली आणि ती सर्वकाही विसरून गेली. मग तिची स्मृती परत आली नि त्यास सर्वकाही आठवू लागले. कधीकधी स्वप्नात बालपणातल्या गोष्टी दिसू लागतात. यावरून हे सिद्ध होते की मनुष्याचे सर्वच विचार कोठेतरी सुरक्षित असतात आणि म्हणूनच ते परत येतात. अर्थातच त्याचे सर्वच विचार आणि स्मृती त्याच्या अचेतन मस्तिष्कात नोंद होत असतात. मग ही सतत नोंदणी होण्याचे कारण काय? भौतिकशास्त्रानुसार, माणूस जेव्हा बोलतो तेव्हा त्याच्या मुखावाटे आवाज बाहेर पडतो आणि या ध्वनी एक लक्ष ८६ हजार मैल प्रति सेकंदाच्या गतीने हवेत भ्रमण करीत असतात. विज्ञानाच्या प्रगतीमुळे भूतकाळातील आवाज अगर ध्वनी मुद्रित करून ऐकणेही शक्य झाले, मात्र ध्वनी आपसांत विभक्त करून ऐकणे शक्य झालेले नाही. यावरून लक्षात येते की मानवाच्या समस्त ध्वनी नोंदविण्यात येत आहेत, मग हे ध्वनिमुद्रण का होत आहे?

मानवाच्या शरीरातून उष्ण लहरी निघत असून या माणसाच्या प्रत्येक कृती व क्रियेचे छायाचित्र तयार करतात. नोव्हेंबर १९६० च्या 'रीडर डायजेस्ट' या इंग्रजी मासिकात याविषयी सविस्तर लेख कदाचित तुम्ही वाचलाही असेल. त्या लिहिले आहे की अमेरिकेवरून एक विमान गेले. दोन तासांनंतर विमान गेलेल्या रिकाम्या मार्गावरून विमानातील प्रवाशांची छायाचित्रे घेण्यात आली. ही छायाचित्र ज्या कॅमेऱ्याने घेतली गेली त्यास 'इव्हॅपोरॅग्राफ' असे म्हटले गेले. यावरून या विषयावर विज्ञान जगतात चर्चेला सुरुवात झाली की एका स्थळावरून माणूस निघून गेल्यावर त्या रिकाम्या स्थळावर माणसाचे छायाचित्र अवकाशात असते, मात्र काही तासांपर्यंत असते की कायमस्वरूपी असते, अशीदेखील संभावना आहे की हे छायाचित्र कायमस्वरूपी राहत असेल. अद्यापही विज्ञानाने रिकाम्या स्थळावरून छायाचित्र प्राप्त करण्याइतपत प्रगती केली नाही. मात्र काही काळानंतर हे शक्यसुद्धा आहे. असो! मानवाची प्रत्येक क्रिया या सृष्टीत नोंदविण्यात येत असून हे रेकॉर्ड सुरक्षित असण्यामागे कोणते कारण आहे? अर्थातच माणसाचे विचार, त्याच्या क्रिया आणि त्याच्या हालचाली आणि आवाज सुरक्षित ठेवण्याचे काय कारण आहे?

आपल्या मनमस्तिष्कात उभ्या राहणाऱ्या या गंभीर आणि अतिशय महत्त्वपूर्ण असलेल्या प्रश्नांची उत्तरे स्वतः ईश्वरानेच दिली आहेत. ईश्वराने दाखवून दिले की मानवाला कधीही नष्ट न करण्यासाठी अर्थात सदैव जीवंत ठेवण्यासाठीच निर्माण करण्यात

आले आहे. मानवाच्या जीवनाचे मुळात दोन भाग आहेत. प्रथम जन्मापासून मृत्यूपर्यंतचे जीवन आणि द्वितीय पारलौकिक जीवन. मृत्यूपूर्वीचे जीवन हे अस्थायी आणि एका मर्यादित काळासाठी देण्यात आलेले असून हे मानवाची परीक्षा घेण्यासाठी असलेले जीवन आहे. मृत्यूनंतरचे हे जीवन कधीही न संपणारे अर्थात कायमस्वरूपी जीवन होय. या परलोकी जीवनात इहलोकी जीवनात केलेल्या चांगल्या आणि वाईट कर्मांचा जाब घेऊन चांगले कर्म असतील तर मोक्ष प्राप्त होऊन कायमस्वरूपी स्वर्गाची प्राप्ती होईल आणि वाईट कर्म असतील तर कायमस्वरूपी नरकाच्या यातना भोगाव्या लागतील. परलोकी जीवनावर श्रद्धा ठेवणे मानवासमोर उद्‌भवणाऱ्या समस्त प्रश्नांची उत्तरे होय.

जीवनाची वास्तविकता मृत्यूबरोबर संपत नाही. जणू टी.व्ही.वर चालू असलेला एखादा चित्रपट मध्यंतरीच संपला असल्याचे जाहीर झाले, किंवा एखादी कादंबरी मध्यतरीच संपल्याचे जाहीर करण्यात आले असावे. चित्रपट पाहणारा अथवा कादंबरी वाचणारा निश्चितच मान्य करणार नाही की चित्रपट खरोखरच समाप्त झाला अथवा कादंबरी संपली. चित्रपट दर्शक अगर कादंबरीचा वाचक निश्चितच समाधानी होणार नाही. त्याला चित्रपट अगर कादंबरीचा शेवट अगर निष्कर्ष जाणून घेण्याची तीव्र इच्छा निर्माण होईल. याचप्रमाणे जीवनाच्या कथेचा जर मध्यंतरीच शेवट झाला, अर्थात मृत्यूसमयीच शेवट झाला म्हणून जाहीर करण्यात आला तर कोणासही मुळीच समाधान होणार नाही. जीवन नावाच्या या कथेचा अंतिम निष्कर्ष जाणून घेतल्याशिवाय कोणत्याही विवेकी माणसाचे समाधान होणे शक्य नाही. याचाच अर्थ असा झाला की जीवन हे कधीही संपणारे नसून मृत्यूपर्यंतचे जीवन हे परीक्षाकाळ आहे, या परीक्षेचा निकाल मृत्यूनंतरच्या जीवनात लागणार आहे आणि या निकालानंतरचे जीवन कधीही संपणारे नाही. परीक्षेत चांगले गुण मिळाले तर स्वर्गप्राप्ती आणि अनुत्तीर्ण झाल्यास नरकयातना भोगाव्या लागतील. मृत्यू जीवनाचा अंत नसून परीक्षाकाळ संपल्याची घंटा होय. येथूनच जीवनाचा दुसरा व कधीही न संपणारा टप्पा सुरू होतो. या दुसऱ्या टप्प्यातील कधीही न संपणाऱ्या जीवनात उत्तीर्ण व सफल होण्यासाठी या इहलोककाळातील परीक्षेत उत्तम गुण मिळविण्याची तयारी करावी, तरच या जीवनाचा चांगला-वाईट निकाल समोर येईल. निकाल नसलेली परीक्षा ही परीक्षाच नसते मुळी!

मृत्यूनंतरच्या जीवनाची कल्पना जवळपास सर्वच धर्मांत आढळते, एव्हाना वैदिक धर्मातसुद्धा आढळते. वेदांमध्ये आवागमन आणि पुनर्जन्माची धारणा कोठेही आढळत नाही. आवागमन आणि पुनर्जन्म या दोन भिन्न गोष्टी आहेत. वेदांमध्ये पुनर्जन्माचा नव्हे तर पुनरुज्जीवनाचा उल्लेख आहे. पुनरुज्जीवनाचा अर्थ मनुष्यास आपल्या कर्मांनुसार परत एकदा जीवित होणे असा होतो. याउलट आवागमनाचा अर्थ मोक्षप्राप्तीसाठी आपल्या कर्मानुसार ८४ लाख योनींतून वारंवार जन्म घेणे, असा होतो. उपनिषदकाळात सर्वप्रथम पुनर्जन्माचाच (परलोकात नव्हे तर या लोकातदेखील कर्मानुसार प्राणी जन्म घेणे) उल्लेख

आहे.

पुनर्जन्माचा आरंभिक शब्द 'पुन्हा' याचा 'वारंवार' असा अर्थ होत नसून 'परत एकदा' असा होतो. मात्र उपनिषदांच्या माध्यमाने या शब्दाचा अर्थ 'वारंवार' ग्रहण करून याची स्थापना करण्यात आली आणि नंतर रामायण, महाभारत आणि इतर धर्मशास्त्रांत ही कल्पना अधिक जास्त रूढ करण्यात आली. यामध्ये 'श्राद्ध-सिद्धान्त' म्हणजेच मृतात्म्यास शांती प्रदान करण्यासाठी कर्मकांडसुद्धा असून हे पुनर्जन्माच्या पूर्णत: विपरित आहे.

कुरआनच्या धारणेनुसार प्रत्येक मनुष्यास मृत्यूनंतर परत एकदा जीवित करण्यात येईल. हे जीवन कधीही नष्ट होणारे नाही. हे वर्तमान जीवन कर्मस्थळ असून मृत्यूनंतरचे शाश्वत व अविनाशी जीवन, या वर्तमान जीवनातील चांगल्या व वाईट कर्मांच्या आधारावर चांगले वा वाईट फलित मिळण्याचे ठिकाण होय. या सृष्टीत जन्म घेणारा प्रत्येक मनुष्य आपल्यासोबत परतीचे तिकीट घेऊन आलेला असून हे परतीचे तिकीट म्हणजे 'मृत्यू' होय. मनुष्य हा इतरांचे म्हातारपण, दु:ख-कष्ट आणि अर्थी पाहून असा निष्कर्ष काढतो की जीवन म्हणजे दु:ख होय. मात्र हे खरे नाही. जीवन हे दु:खाने भरलेले असल्याचे मत हे कोण्या एखाद्याचे वैयक्तिक मत असू शकते. सत्य गोष्ट अशी की दु:ख, म्हातारपण, रोगराई हे सर्व ईश्वरातर्फे परीक्षण असून संपणार आहे. या दु:खाचा उत्तम मोबदला परलोकी जीवनात मिळणारच आहे. ईश्वराने म्हटलेले आहे की हे वर्तमान जीवन परीक्षा असून परीक्षा संपत आल्याची सूचना आहे आणि मृत्यू हे परीक्षा संपण्याची घंटा आहे.

या जगात दररोज जवळपास दीड लाख लोकांचा मृत्यू होतो अर्थात ते हे जग सोडून निघून जातात. हे शेवटी जातात कुठे? हा मोठा गंभीर प्रश्न आहे. या अतिमहत्त्वाच्या प्रश्नाला बगल देऊन अगर डोळेझाक करून चालणार नाही. जगातील कोणत्याही संशोधनातून या प्रश्नाचे नेमके उत्तर सापडणे शक्य नसून केवळ धर्मच याचे उत्तर देऊ शकतो. याशिवाय या प्रश्नाचे नेमके उत्तरसुद्धा असाच धर्म देऊ शकतो, ज्याने जीवन आणि मृत्यू देणाऱ्याची (ईश्वराची) वाणी विशुद्ध आणि पूर्णपणे सुरक्षित करून ठेवली आहे. मग मनुष्याच्या मृत्यूची घटिका अर्थात परीक्षाकाळ संपण्याची घंटा किंवा घोषणेची वेळ निश्चित करून ठेवण्यात आलेली आहे काय? कुरआनने या प्रश्नाचे उत्तर होकारार्थी दिले आहे. कुरआनने स्पष्टपणे म्हटले आहे की प्रत्येक मनुष्याच्या मृत्यूची वेळ अगोदरच निश्चित करण्यात आलेली आहे. याविषयी कुरआनचे शब्द असे आहेत,

"कोणीही सजीव अल्लाहच्या आज्ञेशिवाय मरू शकत नाही. मृत्यूची घटका तर लिहिली गेली आहे."

(दिव्य कुरआन, ३:१४५)

मनुष्याने प्रत्येक कर्म करतेवेळेस याचा पूर्ण विचार करावा की आपण मरणार आहोत. अर्थातच मनुष्याने वारंवार मृत्यूचे स्मरण करावे. यामुळे माणसाच्या चारित्र्यावर चांगला प्रभाव पडतो. सत्कर्म करण्याची प्रेरणा मिळते आणि दुष्कर्मांपासून परावृत्त होतो.

पापांवर पश्चात्ताप करतो. इतरांवर अन्याय व अत्याचार करण्यापासून दूर राहतो.

आपल्या मर्जीने मृत्यू मागणे वा मृत्यूची कामना करणे किंवा आत्महत्या करणे इस्लामने पूर्णत: निषिद्ध ठरविले आहे. कारण हे वैफल्यग्रस्त आणि ईशकृपेपासून निराश होण्यासम तसेच ईशमर्जी आणि योजनेशी विद्रोह करण्यासारखे आहे. आदरणीय मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"तुमच्यापैकी कोणीही (कोणत्याही कारणास्तव) मृत्यूची कामना आणि लवकर मृत्यू येण्याची प्रार्थना करता कामा नये. कारण जेव्हा मृत्यू येईल, त्याच्या कर्मांची शृंखला थांबेल आणि ईश्वरास (त्याच्या मार्गदर्शनानुसार) स्वीकार करणाऱ्या (माणसा)साठी त्याचे आयुष्य चांगुलपणात वृद्धी करण्याचे साधन सिद्ध होते." (हदीस : मुस्लिम)

आणखीन एकेठिकाणी आदरणीय मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"मृत्यूची प्रार्थना व कामना करू नका. ईश्वराशी जर प्रार्थनाच करायची असेल तर अशी करावी, हे ईश्वरा! माझ्याकरिता जोपर्यंत जीवन योग्य असेल तोपर्यंतच जीवित ठेव आणि जेव्हा मृत्यू योग्य असेल तेव्हा मृत्यू दे!" (हदीस : नसई)

वरील मजकुराचा सारांश असा आहे की ईश्वर एक असलेल्या सिद्धान्ताचा आपण अशाप्रकारे स्वीकार करावा की ईश्वराच्या अस्तित्वात, गुणांत, अधिकारात, सत्ता आणि स्वामित्वात कोणासही सामील करता कामा नये. अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ईशआदेशपालनाची अर्थात दासत्वाची पूर्ण पद्धत प्रत्यक्षात स्वत: कृती करून आपल्याला दाखविली आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर अंतिम ग्रंथ कुरआन अवतरित झाला, जो पूर्णत: विशुद्ध रूपाने सुरक्षित आहे. हा ग्रंथ जगाच्या पाठीवरील समस्त मानवजातीकरिता मार्गदर्शन आहे. या इहलोकी आणि परलोकी जीवनात यश आणि मुक्ती मिळविण्यासाठी या सत्यधारणा स्वीकारताना ईश्वराच्या मार्गावर चालण्यासाठी नितांत गरजेच्या आहेत.

# परलोकी जीवनाची तयारी आतापासूनच...

**- मुहम्मद जैनुल आबिदीन मन्सूरी**

या वर्तमान भौतिक जीवनाचा अंत होणे एक सर्वस्वीकृत सत्य आहे. ही गोष्ट वेगळी की याच्या अंतानंतर काय होईल, यात मतभेद असू शकतात. धर्माची अगर आस्तिकतेची भूमिका अशी आहे की या वर्तमान जीवनानंतर आणखीन एका नवीन जीवनाची सुरुवात होणार असून ते जीवन शाश्वत व कधीही न संपणारे जीवन आहे. याउलट नास्तिक आणि निधर्मी लोकांची अशी भूमिका आहे की या जीवनानंतर कोणत्याही प्रकारचे जीवन नाही. हे जीवन येथेच नष्ट होणारे आहे. त्यांची स्पष्ट भूमिका अशी आहे की मानवशरीर मृत्यूबरोबरच सडून जाणार, मातीत मिसळणार, जळून खाक होणार आणि मग असे घडल्यावर अर्थात शरीर नष्ट झाल्यावर परत शरीर धारण करून जीवन प्राप्त होणे शक्य नाही.

## धारणांच्या प्रभावांतील फरक

उपरोक्त दोन्ही दृष्टिकोनांपैकी कोणत्याही एका दृष्टिकोनाचा स्वीकार करण्याचे माणसाला पूर्ण स्वातंत्र्य आहे. त्याच्यावर कोणतीही बळजबरी नाही. मात्र सृष्टीमध्ये फक्त मनुष्यालाच ईश्वराने बुद्धी व विवेकसामर्थ्य दिले असल्याने या विवेकसामर्थ्याचा पूर्णपणे वापर करून विचार करणे आवश्यक आहे की दोन्ही विपरित दृष्टिकोनांचा माणसाच्या आचारविचार, व्यवहार आणि चारित्र्यावर पडणाऱ्या प्रभावांवर गंभीर विचार करावा. हीच गोष्ट मनुष्य आणि इतर प्राण्यामध्ये फरक सिद्ध करते आणि यामुळेच मनुष्य इतर प्राण्यांपासून श्रेष्ठ, आदरपात्र, सन्मानपात्र आणि विशिष्ट सिद्ध होतो.

ईश्वरावर पूर्ण विश्वास ठेवणे हाच धार्मिक भूमिकेचा मूळ आधार होय. ईश्वरास स्रष्टा, निर्माता, स्वामी, प्रभू, पालनकर्ता, निरीक्षक, परीक्षक, संरक्षक, न्यायाधिपती, पूज्य व उपास्य मानणे ही धर्माची मूळ भूमिका होय. हा दृष्टिकोन स्वीकारल्यावर मानवाने ईश्वराचा आज्ञाधारक, कृतज्ञ, दास, ईशपरायण होणे आवश्यक आहे. त्याचे जीवनकर्म उत्तम असावे. अर्थात त्याचे पूर्ण जीवनच पुण्यकर्मांनी भरलेले आणि सदाचारी असेल. उपद्रवी, अवज्ञाकारी, अन्यायी व अत्याचाऱ्यांपेक्षा पूर्णत: भिन्न असेल.

## दुसऱ्या दृष्टिकोनाचा प्रभाव

दुसरा दृष्टिकोन नास्तिक, निधर्मीजनांचा असून मानवजात, पशु-पक्षी आणि समस्त सृष्टीवर याचा विलक्षण प्रभाव पडतो. मानवाच्या आणि पशुंच्या जीवनाच्या उद्देशामध्ये आणि जीवनशैलीमध्ये अगदीच हलका फरक असणे हाच या विचारसरणीचा प्रभाव होय.

अर्थातच पशु-पक्ष्यांसाठी 'खाणे-पिणे आणि मरून जाणे' एवढाच जीवनाचा उद्देश बाकी राहतो. मात्र मानवजीवनाचा उद्देश यापेक्षाही दोन पावले पुढे असतो. म्हणजेच खाणे-पिणे, ऐशोआराम करणे, मौजमस्ती करणे आणि आपल्या इच्छा-आकांक्षा व अभिलाषा पूर्ण करण्यासाठी वाटेल ते करणे हाच जीवनाचा एकमेव उद्देश ठरतो. मात्र मानव आणि पशु-पक्ष्यांच्या जीवनातील हाच हलकाफुलका फरक मानव आणि समाजास, मानवता आणि मानवी मूल्यांस पायदळी तुडविण्यासाठी बाध्य करतो. यामुळे मानवी गौरव आणि गरिमा, आत्मसन्मान आणि उत्कृष्टतेचा निर्घृणपणे बळी जातो. हेच मुख्य कारण आहे की जगामध्ये भयानक उपद्रव, लूटमार, रक्तपात, शोषण, प्रताडना, अनाचार, स्वैराचार, नरसंहार, व्यभिचार, अन्याय, भ्रष्टाचार, अत्याचार आणि विध्वंसाचा ज्वालामुखी फुटला आणि मानवतेस आपल्या अतिउग्र व तप्त ज्वालेत जाळून खाक केले. सर्वत्र हाहाकार माजला आणि जीवनातले जीवनपण, शांती, सुख व समाधानाची पूर्णत: राखरांगोळी झाली. सर्वत्र अपराधीकरणाचे धूर आणि गगनास भिडणाऱ्या ज्वाला रक्त ओकत आहेत. या समस्यांची प्रामुख्याने तीन कारणे आहेत. प्रथम ईशधर्म नाकारणे, द्वितीय धर्माचा स्वीकार करूनही धर्माप्रति उदासीनता व विमुखता आणि तृतीय व महत्त्वपूर्ण कारण म्हणजे आपल्या अनुयायांना ईश्वरासमक्ष आपापल्या कर्मांचा जाब देण्याचा प्रबळ आणि यथार्थ विश्वास जगातील ७५ टक्के जनतेस प्रदान करण्याची क्षमता व शक्ती धर्मामध्ये नसणे होय. असा दृढ विश्वास जो ईश्वरासमोर उत्तरदायित्वाच्या भावनेआधारे मनुष्य, समाज व सामूहिक व्यवस्थेस उत्तम, चारित्र्यवान, शालीन व उपकारी बनविण्याची; तसेच उपद्रव, दुष्कर्म, अन्याय, अत्याचारांपासून दूर ठेवण्याची क्षमता धर्मामध्ये नसणे, हे अतिप्रमुख कारण होय.

## इस्लामची भूमिका

जगातील सर्वच धर्मांपैकी इस्लामच एक असा धर्म आहे जो या वर्तमान जीवनानंतर अर्थात मृत्यूपश्चात जीवन असण्याची धारणा प्रदान करतो. ही धारणा विशुद्ध एकेश्वरत्व, पैगंबरत्व आणि परलोकत्व या तीन धारणांपैकी एक धारणा आहे. या धारणेची एक सरळ व स्पष्ट व्याख्या खालीलप्रमाणे आहे-

"मनुष्याला या जगामध्ये एका विशिष्ट काळासाठी जीवन देण्यात आलेले आहे. मात्र मानवाचे जीवन हे या विशिष्ट काळापुरते मर्यादित नसून दीर्घकालीन आहे. या जीवनाचे दोन टप्पे वेगवेगळे दिसत असले तरी प्रत्यक्षात एकदुसऱ्याशी संबंधित आहे. येथील (इहलोकी) जीवन समाप्त होताच अर्थात मृत्यू होताच पुढील (परलोकी) जीवनाचा आरंभ होतो. म्हणजेच मृत्यू हे जीवनाचा अंत नसून इहलोकी जीवनातून परलोकी जीवनात प्रवेश करण्याचे प्रवेशद्वार होय. महाप्रलयानंतर या जीवनातील नष्ट झालेले शरीर ईश्वराच्या महान व असामान्य निर्मितीशक्तीद्वारे पुन्हा अस्तित्वात येईल. मानव परत एकदा पुनरुज्जीवित करण्यात येईल. यानंतर जगाचा आरंभ झाल्यापासून जगाचा अंत होईपर्यंत जगातील समस्त

मानवजात ईश्वरासमोर हजर करण्यात येईल. प्रत्येक व्यक्तीचे कर्मपत्र ईश्वरासमोर सादर करण्यात येईल आणि पूर्ण न्यायास अनुसरूनच प्रत्येकाच्या कर्मांचा हिशेब करण्यात येईल. न्याय-निवाडा करतेवेळेस कोणाशीही जात-पात, वर्ण, वंश, भाषा, वर्ग आणि राष्ट्र वगैरेंच्या आधारावर मुळीच पक्षपात करण्यात येणार नाही. वर्तमान जीवनातील गरीब-श्रीमंत, उच्च-नीच, राजा-प्रजा, स्पृश्यास्पृश्य, शासक-शासित, मालक-नोकर, सबळ-दुर्बल, सत्ताधारी-सत्ताविहिन वगैरे प्रकारचे सर्वच मानदंड अतिमहान प्रभुत्वशाली, अत्युच्च न्यायप्रद, निष्पक्ष, सर्वशक्तिमान, तत्त्वदर्शी ईश्वराच्या न्यायालयात नष्ट करण्यात येतील. प्रत्येकाबरोबर दोषरहित, त्रुटीरहित आणि परिपूर्ण न्याय होईल. प्रत्येकास त्याच्या जीवनभराचा लेखाजोखा, कर्मपत्र आणि निकाल देण्यात येईल. आपापल्या कर्मांच्या आधारावर काहींना मोक्ष मिळून स्वर्गप्राप्ती होईल आणि काहींना नरकाग्नीत झोकून देण्यात येईल. वैभव, सुख-शांती, विश्राम आणि समाधान; तसेच समस्त इच्छा, कामना आणि हौस पूर्ण करणाऱ्या अनुग्रहांचे एक शाश्वत, अमर व अविनाशी जीवन असलेले स्वर्ग असेल आणि अशा या स्वर्गाची खऱ्या अर्थाने कल्पना करणेसुद्धा या अस्थायी, त्रुटीपूर्ण, नश्वर जीवनात करणे मुळीच शक्य नाही. याउलट सदैव दुःख, प्रताडना, तप्त आगीच्या स्वरूपातील असह्य असलेल्या ईशप्रकोपाचे भयानक स्वरूप असलेल्या नरकाग्नीतील कधीही न संपणाऱ्या भयावह जीवनाची कल्पना करणेही या (इहलोकी) जीवनात शक्य नाही.''

## मानवस्वभावाची नैसर्गिक गरज

मानवस्वभाव जर आपल्या मूळ प्रवृत्तीवर कायम असेल आणि ते जर विभिन्न प्रकारच्या बाहेरील आणि अंतर्गत विकार व नैतिक विकारांनी, बिघाड व अमौलिकतेने ग्रस्त व जीर्णशीर्ण झालेले नसेल तर हा असा मूळ आणि शुद्ध मानवस्वभाव साहजिकच अशी मागणी करतो अथवा अशा निरोगी मानवास स्वाभाविकच असे मनापासून वाटते की-

१) चांगल्या आणि वाईट अर्थात निष्पाप आणि अपराधी लोकांचा परिणाम सारखाच होऊ नये. कारण चांगले कर्म करून मरण पावलेल्या आणि अपराधी कर्म करून मरण पावलेल्या अर्थात दोन्ही प्रकारच्या लोकांचे शरीर अगदी सारख्याच पद्धतीने सडून, मातीत व वातावरणात विलीन होऊन नष्ट होत असेल तर चांगल्या कर्मांचा काय उपयोग! दोघांचा सारखाच परिणाम झाल्यास सत्कर्मांचा उपयोग काय आणि दुष्कर्मांचे नुकसान काय? म्हणून असे होऊ नये की सत्कर्मी आणि दुष्कर्मींचा परिणाम सारखाच व्हावा.

२) ईशद्रोही, ईशआज्ञांना पायदळी तुडवून जीवन जगणारे आणि ईश्वरास नाकारणारे जे लोक आहेत यांचा परिणाम; तसेच ईशोपासक, ईशमार्गदर्शनानुसार जीवन जगणारे, ईशपरायण लोक; या दोन्ही प्रकारच्या लोकांचा मृत्यूनंतर त्यांना त्यांच्या चांगल्या व वाईट कर्मांनुसार वेगवेगळे करण्यात यावे.

३) ज्या लोकांनी अन्याय, अत्याचार केले आणि धन, सत्ता, शिफारस, धमक्या, अरेरावी केली, उपद्रवांचे नग्न तांडव माजविले, आपल्या पैशांच्या आणि सत्ता व सामर्थ्याच्या बळावर कायदा खिशात घालून निर्दोष सुटले अथवा कायद्यातील त्रुटी, प्रावधान, मर्यादा अथवा पक्षपाती अवस्थेमुळे जगात त्यांना क्लीनचिट मिळाली, त्यांना त्यांच्या वाईट कर्मांची अथवा न्यायोचित पूर्ण शिक्षा जी या (इहलोकी) जीवनात मिळू शकली नाही, ती त्यास पूर्णपणे मिळायलाच हवी.

४) वर्तमान जीवनात ज्या लोकांवर अन्याय व अत्याचार झाले, ज्यांच्या अधिकारांची पायमल्ली व हनन झाले, ज्यांना शोषण आणि पिळवणुकीचे चटके सोसावे लागले, ज्यांना पूर्ण काय अर्धवटसुद्धा न्याय मिळाला नाही, त्यांना कधी न कधी आणि कोठे न कोठे न्याय मिळायलाच हवा. कारण ईश्वरासंबंधी अशी मुळीच कल्पनासुद्धा करणे शक्य नाही की त्याने मानवास आणि मानवसमाजास अराजकतेच्या जबड्यात झोकून दिले.

५) ज्या लोकांनी सत्याची कास धरून जीवनाची वाटचाल केली, घोर कष्ट, मोठमोठी संकटे आणि त्रासांना न जुमानता कधीही सत्य आणि न्यायाची कास सोडली नाही; अन्याय, शोषण, उपद्रव, अराजकता, अत्याचार आणि भ्रष्टाचार व भौतिकवादाच्या भयानक वादळातही ज्यांची पावले डगमगली नाहीत; त्याचप्रमाणे या (इहलोकी) जीवनात त्यांना सत्यनिष्ठा, सदाचार आणि सत्कर्मांचा भरपूर आणि चांगला मोबदला, पारितोषिक अथवा उत्तम फलित जर मिळाले नसेल तर हे मिळण्यासाठी त्यांना आणखीन एक नवीन जीवन मिळायलाच हवे.

# इस्लामची परलोकासंबंधी धारणा

वर उल्लेखण्यात आलेल्या मानवजीवनाच्या समस्त अपेक्षांची चांगल्या रितीने पूर्तता केवळ इस्लामने प्रदान केलेल्या धारणेतच होऊ शकते. हीच धारणा मानवी स्वभावाशी पूर्णतः अनुकूल आणि बुद्धिसंमत आहे. याच धारणेमुळे वरील अपेक्षा सक्षम, सक्रिय, स्वाभाविकरित्या, परिपूर्ण व समाधानकारकरित्या पूर्ण होणे शक्य होय.

## या धारणेशी इतर धारणांची तुलना

मृत्यूनंतरच्या जीवनासंबंधी अनेक धार्मिक धारणा या जगामध्ये आहेत. त्यांच्यावर एक तुलनात्मक आणि धावती नजर आपण टाकू या. यामुळे इस्लामी धारणेचे श्रेष्ठत्व आणि वैशिष्ट्य सहज दिसून येईल. या ठिकाणी आपण इस्लामव्यतिरिक्त अन्य धर्मांच्या धारणांचा थोडक्यात उहापोह करू या.

(१) एक धारणा अशी आहे की अमुक विभूती अथवा व्यक्तित्वावर श्रद्धा ठेवणेच मोक्ष, मुक्ती वा परलोकात स्वर्गप्राप्तीसाठी पुरेसे आहे. अशी श्रद्धा असताना पुण्य-पाप, सदाचार-

दुराचार वगैरे गोष्टी निरर्थक ठरतात. अर्थातच जीवनात पाप करा अथवा पुण्य करा, याशी काहीही देणेघेणे नाही. मोक्ष वा मुक्ती प्राप्त करण्यासाठी अमुक विभूतीवर श्रद्धा ठेवली की झाले! या धारणेवर श्रद्धा ठेवणारा मानवसमाज कसा असेल? या समाजातील नैतिक आणि चारित्र्यिक वातावरण कसे असेल, हे सांगण्याची गरज नाही. विशेषत: मागील निम्म्या शतकापासून या धारणेमुळे निर्माण झालेल्या मानसिकता, सभ्यता, संस्कृती आणि सगळ्या जगात माजलेली अरेरावी मानवतेस भोगावी लागत आहे.

(२) एक धारणा अशी आहे की हेच जीवन सत्कर्म करणाऱ्यांसाठी स्वर्ग आणि दुष्कर्म करणाऱ्यांसाठी नरक आहे. म्हणून आता परलोकी जीवनाची गरज नाही. अशी श्रद्धा असलेले लोक जीवनाच्या इतर बाबींत मात्र पूर्ण विवेक, अध्ययन-विश्लेषण, ज्ञानोपार्जन, डोळसपणा, दूरदृष्टी आणि गांभीर्याने काम घेत असतात. मात्र एका अत्यंत गंभीर विषयात जी गोष्ट सर्वप्रथम आणि पूर्णत: झुगारून देतात ती गोष्ट म्हणजे गंभीरता होय. दुष्कर्मास याच जीवनात पूर्ण शिक्षा मिळते आणि सत्कर्म करणाऱ्यास याच जीवनात पुण्याचा पूर्णत: मोबदला मिळतो, ही गोष्ट पूर्णपणे असत्य, अवास्तव तर आहेच, शिवाय तर्कसंगतसुद्धा नाही. कारण ही गोष्ट आपण वर्तमान जीवनाच्या प्रत्येक अनुभवाविरुद्ध आणि प्रतिकूल सिद्ध होते.

(३) आणखीन एक धारणा अशी आहे की या जीवनानंतर आपापल्या भल्या-बुऱ्या कर्मानुसार हा आत्मा चांगल्या अगर वाईट जीवजंतूचे शरीर अथवा जीवन धारण करील. त्या जीवजंतूंच्या जीवन-मृत्यूबरोबरच शरीर-परिवर्तनाचा क्रम सुरू राहील. या धारणेमध्ये एक तार्किक त्रुटी अशी आहे की वर्तमान जीवनात मनुष्याच्या चारित्र्यनिर्मितीमध्ये कोणत्याही प्रकारची यथार्थ, प्रभावकारी, सक्रिय भूमिका बजावण्याचे तसेच मनुष्यास ईश्वरासमक्ष परलोकी जीवनात उत्तरदायी ठरविण्याचे व्यावहारिक स्तरावर पूर्णपणे सामर्थ्य नसून यात कोणत्याही स्तरावर यश मिळणे शक्य नाही.

वर उल्लेख करण्यात आलेल्या बिगरइस्लामी धर्मांतील धारणांमधील तिन्ही प्रकारच्या त्रुटी आणि कमतरता; तसेच मर्यादांचे पूर्णपणे समाधान इस्लामने दाखविलेल्या मृत्यूपश्चात जीवनावरील धारणेत आहे. इस्लामचा दृष्टिकोन अगदी स्पष्ट, निश्चित, प्रत्येक प्रकारच्या अडचणींपासून मुक्त आहे. इस्लामची धारणा अशी आहे-

१. प्रत्येक व्यक्तीचे प्रत्येक कर्म, मग ते एकांतात असो, सर्वांसमक्ष करण्यात आलेले असो, अंधारात असो की उजेडात असो; ईश्वराच्या ज्ञान आणि माहितीकक्षेत असून प्रत्येक कर्माची तात्काळ नोंद होत आहे.

२. सर्वशक्तिमान ईश्वराने ज्याप्रमाणे आपल्या अपार शक्तीने प्रथमत: मानवाची निर्मिती केली (खरे पाहता यापूर्वी याचे अस्तित्वसुद्धा नव्हते) त्याचप्रकारे तोच ईश्वर परत एकदा त्यास अस्तित्व प्रदान करील.

३. प्रत्येक मनुष्याच्या जीवनभरातील भल्या-बुऱ्या कर्मांचा पूर्ण मोबदला त्यास परलोकात पूर्ण न्यायासहीत देण्यात येईल.

४. हा मोबदला स्वर्ग अथवा नरकाच्या स्वरूपात असेल.

## कुरआनात परलोकी जीवन

इस्लामचा मूळ स्रोत असलेल्या कुरआन हा ईशग्रंथ ऐतिहासिक, प्रमाणबद्ध आणि विश्वसनीय असण्यावर जगातील मुस्लिम आणि मुस्लिमेतर सर्वच निष्पक्ष व पूर्वग्रहरहित विचारवंत, विद्वान आणि संशोधकांनी पूर्ण विश्वास बहाल केला आहे. हा ग्रंथ म्हणजे आरंभ ते अंत आणि यातील एकन् एक शब्द ईशवाणी असून यात कोणत्याही मानवाचा मुळीच हस्तक्षेप नाही. या ग्रंथात समस्त मानवजीवनासाठी विधान आणि मार्गदर्शन आहे. या ग्रंथात मानवाचे स्थान व दर्जा, मानवाची निर्मिती करण्याचा हेतू, ईश्वराची खरी ओळख, मनुष्य व ईश्वरादरम्यान संबंध, ईश्वराप्रति मनुष्याचे कर्तव्य, इतर लोकांप्रति कर्तव्य-अधिकार, उपासनेची वास्तविकता व पद्धती, मृत्यूनंतरच्या जीवनाची व्याख्या आणि यासारख्या इतर सर्वच बाबींचे सविस्तर वर्णन आहे. पारलौकिक जीवनाविषयी कुरआनातील बऱ्याच आयतींपैकी काहींचा भावानुवाद येथे सादर करीत आहोत.

"मग काय ओढवेल त्यांच्यावर, जेव्हा आम्ही त्यांना त्या दिवशी एकत्र करू, ज्या दिवसाचे आगमन निश्चित आहे? त्या दिवशी प्रत्येक व्यक्तीला तिच्या कमाईचा बदला पुरेपूर दिला जाईल व कोणावरही अत्याचार होणार नाही." (दिव्य कुरआन, ३:२५)

"आणि कर्मनोंद पुढे ठेवली जाईल. त्यावेळी तुम्ही पहाल की अपराधी लोक आपल्या जीवन पुस्तकातील नोंदीला भीत असतील आणि म्हणत असतील की, आमचे दुर्दैव! हे कसले पुस्तक आहे की आमची लहान मोठी कोणतीही कृती अशी उरली नाही जी यामध्ये नोंदली गेली नाही. जे जे काही त्यांनी केले होते ते सर्व त्यांच्या पुढ्यात त्यांना आढळेल आणि तुझा पालनकर्ता कोणावर तिळमात्र अन्याय करणार नाही."

(दिव्य कुरआन, १८:४९)

"कोणताही शब्द त्याच्या तोंडातून असा निघत नाही ज्याला सुरक्षित करण्यासाठी एक विद्यमान निरीक्षक (फरिश्ता) हजर नाही." (दिव्य कुरआन, ५०:१८)

"तुम्हापैकी कोणीही मग तो मोठ्याने बोलो अथवा हळू आणि कोणी रात्रीच्या अंध:कारात लपलेला असो अथवा दिवसाच्या प्रकाशात चालत असो त्याच्यासाठी सर्व एकसारखेच आहे." (दिव्य कुरआन, १३:१०)

"सरतेशेवटी प्रत्येकाला मृत्यू आहे आणि तुम्ही सर्वजण आपापले पुरेपूर मोबदले कयामतच्या दिवशी प्राप्त करणार आहात. यशस्वी खऱ्या अर्थी तोच आहे जो तेथे नरकाग्नीपासून वाचेल व स्वर्गामध्ये दाखल केला जाईल. उरले हे जग, तर ही केवळ एक

भुरळ पाडणारी बाब आहे.'' (दिव्य कुरआन, ३:१८५)

''काय माणूस असे समजतो की आम्ही त्याच्या हाडांना गोळा करू शकणार नाही? का नाही? आम्ही तर त्याच्या बोटांची पेरे-पेरेसुद्धा नीट बनविण्यास समर्थ आहोत, परंतु माणूस इच्छितो की पुढेसुद्धा दुष्कृत्ये करीत रहावीत.'' (दिव्य कुरआन, ७५:३-५)

## हदीसग्रंथात परलोकी जीवन

हदीस म्हणजे पैगंबर मुहम्मद (स.) यांची वचने आणि जीवनाचरणाच्या पद्धतीचा परिपूर्ण संग्रह होय. त्यांचे कार्य, त्यांची कथने, हालचाली, वक्तव्ये, भाषणे आणि कर्मपद्धती सुरक्षित असलेल्या ग्रंथास हदीसग्रंथ असे म्हणतात. खरे पाहता कुरआनच्या समस्त शिकवणींवर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी प्रत्यक्ष कृती करून दाखविली आणि एकेक शिकवणीची व्याख्या करून दाखविली, याच सुरक्षित ग्रंथांना हदीस असे म्हणतात. हे समस्त हदीसग्रंथ कित्येक भाषांमध्ये अनुवादित करण्यात आले आहेत.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी परलोक, स्वर्ग, नरकासंबंधी केलेली अनेक कथने आणि वक्तव्यांपैकी काही वक्तव्ये येथे देत आहोत.

अ) अंतिम निवाड्याच्या दिवशी प्रत्येक मनुष्य जोपर्यंत ईश्वराला या पाच प्रश्नांची उत्तरे देणार नाही, तोपर्यंत एकही पाऊल पुढे सरकू शकणार नाही.

(१) आपले आयुष्य कसे व्यतीत केले (अर्थात ईश्वराच्या आज्ञेनुसार की त्याच्या विपरित)?

(२) आपले तारुण्य कशाप्रकारे व्यतीत केले (अर्थात ईश्वराच्या आज्ञेनुसार की त्याच्या विपरित)?

(३) संपत्ती कशी व कोठून मिळविली (अर्थात वैधरित्या की अवैधरित्या कमवली)?

(४) संपत्ती कोठे खर्च केली (अर्थात चांगल्या आणि वैध कामात खर्च केली की दुष्कर्मांत खर्च केली)?

(५) जे (सत्याचे) ज्ञान मिळविले, त्यावर किती कृती केली? *(हदीस : तिर्मिजी)*

ब) ज्या व्यक्तीकडे धनसंपत्ती नसते तिला दरिद्री म्हटले जाते. मात्र माझ्या अनुयायांतील दरिद्री व्यक्ती ही धनसंपत्ती नसलेली व्यक्ती नसून ती अशी व्यक्ती आहे जी नमाज अदा करते, रोजे (इस्लामी उपवास) ठेवते, ईश्वराची खूप उपासना करते (नमाज-रोजांचा प्रचंड संग्रह घेऊन) ती व्यक्ती ईश्वरासमोर (परलोकी जीवनात) हजर होईल. मात्र कोणाचा अधिकार हिरावून घेतलेला असेल, कोणास त्रास दिलेला असेल, कोणाचे मन दुखावले असेल, कोणास शिवी दिली असेल वा कोणावर अन्याय-अत्याचार केला असेल, मग न्याय करण्यासाठी ईश्वर त्याची नमाज, रोजाची पुण्यकर्मे तिच्याकडून प्रभावित झालेल्या अन्याय व अत्याचारपीडितांना देण्यात येतील आणि या व्यक्तीकडे शेवटी काहीही उरणार

नाही. अशाप्रकारे ही व्यक्ती पूर्णत: दरिद्री होईल. आता त्या व्यक्तीकडे फक्त कुकर्मच उरतील आणि नमाज-रोजांतून मिळविलेली पुण्ये प्रभावित आणि पीडित लोकांच्या खात्यात येतील व याचप्रमाणे पीडितांची पापकर्मे या व्यक्तीच्या खात्यात टाकण्यात येतील. अशाप्रकारे ही व्यक्ती (इतरांना त्रास दिल्यामुळे दरिद्री झालेली व्यक्ती) नरकात झोकून देण्यात येईल!''

क) ''ज्या व्यक्तीने मुलींपेक्षा मुलग्यांना महत्त्व दिले नसेल, मुलींची हत्या केली नसेल (अथवा स्त्री-भ्रूणहत्या केली नसेल) आणि मुलींशी स्नेहपूर्ण व चांगला व्यवहार केला असेल, त्यांचे (मुलींचे) उत्तमप्रकारे पालनपोषण व शिक्षण-प्रशिक्षण केले असेल, त्याचप्रमाणे चांगल्या संस्कारांनी अलंकृत केले असेल, त्याचप्रमाणे चांगल्या घरात मुलींचे लग्न करून दिले असेल, ती व्यक्ती स्वर्गामध्ये अगदी या दोन बोटांप्रमाणे माझ्यासोबत असेल.'' असे म्हणून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपली दोन बोटे परस्पर जोडून दाखविली.

ड) त्या व्यक्तीवर ईश्वराचा धिक्कार आहे जिच्या घरी तिचे वृद्ध माता-पिता असतील अथवा या दोन्हींपैकी कोणीही एक असेल आणि ती व्यक्ती त्यांची सेवा करून स्वर्गप्राप्ती करीत नसेल.

## परलोकसंबंधी शिकवणींचा मनुष्यजीवनावर पडणारा प्रभाव

मृत्यूपश्चात जीवन, पारलौकिक जीवन आणि स्वर्ग-नरकाच्या या धारणा इस्लाममध्ये केवळ दार्शनिक स्तराच्या कल्पना नसून अगदी दृढ विश्वासाच्या आणि गाढ श्रद्धेच्या स्वरूपातील धारणा आहेत. याच गाढ विश्वास आणि श्रद्धेमुळे व्यक्ती आणि मानवसमाजात अशी अभूतपूर्व क्रांती घडली जिचा उल्लेख इतिहासाच्या असंख्य पृष्ठांवर आढळतो, नव्हे याने इतिहासाची पाने भरलेली आहेत. यातील काही तथ्ये आपण या ठिकाणी अत्यंत संक्षिप्त स्वरूपात देत आहोत.

(१) ज्या अरब प्रदेशात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी इस्लामचा संदेश देण्यास सुरुवात केली, त्या प्रदेशातील मानवसमाज अत्यंत विचित्र आणि विलक्षण स्थितीत जीवन जगत होता. पाण्यासारखी दारू पित होता. इस्लामपूर्वी अरबी साहित्यामध्ये दारूचे दोनशे प्रकार होते. दारूच्या व्यसनास बळी पडलेल्या आणि दारूविषयी काव्य करणाऱ्या या लोकांनी जेव्हा इस्लाम स्वीकारला आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी कुरआनातील मद्यपान निषिद्ध झाल्याची सार्वजनिक घोषणा केली की, ''आजपासून जी व्यक्ती दारूचा एक थेंबसुद्धा घेईल त्यास नरकाग्नीच्या यातना भोगाव्या लागतील!'' आणि अल्लाहने मद्यपान निषिद्ध ठरविल्याचा कुरआनात आदेश आल्याचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जाहीर केले, तेव्हा ही घोषणा ऐकताच लोकांनी विविध प्रकारच्या दारूंनी भरलेले माठ स्वत: आपल्या हातांनी फोडून टाकले, ज्यांनी दारूचे पेले मुखापर्यंत आणले होते ते फेकून दिले, ज्यांनी कंठापर्यंत

दारू रिचविली त्यांनी अक्षरश: उलट्या करून बाहेर काढली, ज्यांनी मद्यपानाच्या मैफलीमध्ये दारू पिली तर इतर उपस्थितांनी त्यांना लाथाबुक्क्यांचा प्रसाद दिला.

(२) "जेव्हा यांच्यापैकी एखाद्याला मुलीच्या जन्माची खुशखबर देण्यात येते तेव्हा त्याच्या चेहऱ्यावर काळिमा पसरतो व तो रक्तासमान घोट गिळून बसतो." (दिव्य कुरआन, १६:५८) विविध कारणांस्तव मुलींना जीवंत गाडण्याची पिशाचीय क्रूर परंपरासुद्धा प्रचलित होती, कन्या-हत्यांविरूद्ध कुरआनामध्ये आयती (८१:८-९) अवतरित झाल्या. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी काही संक्षिप्त आदेश दिले. मग मुलीच्या जन्मावर लोकांचे चेहरे आनंदाने खुलू लागले. मुलीच्या जन्माने आणि तिच्या पालनपोषणाने व तिच्याशी उत्तम व स्नेहपूर्ण व्यवहार केल्याने स्वर्गप्राप्तीची शाश्वती असल्यामुळे त्यांच्या चेहऱ्यावर आनंद ओसंडून वाहू लागला. इस्लामच्या आदेशामुळे कन्या-हत्येचे शापित समाजातून पूर्णत: नष्ट झाले.

(३) माता-पिताची विशेषत: त्यांच्या वृद्धापकाळामध्ये, जेव्हा ते आश्रित व दुर्बल होतील, काळजी घेण्याची, त्याचा आदरसन्मान आणि आज्ञापालन करण्याची प्रथा सुरू झाली.

ईशन्याय, कर्मांचा पूर्ण मोबदला, स्वर्गाची इच्छा आणि नरकाग्नीपासून मुक्ती मिळविण्याचे प्रयत्न अर्थात अशा तऱ्हेच्या पारलौकिक जीवनात यश मिळविण्याच्या धारणेमुळे मानवजीवनाच्या प्रत्येक पैलूला अलंकृत केले. जगाच्या पाठीवरील सर्वांत जास्त असभ्य, विकृत मानसिकता, निरक्षर व अज्ञानी, भांडखोर व अनैतिक, दुराचारी व दुष्कर्मी, दारूड्या व मद्यपी समाजाने जेव्हा इस्लाम स्वीकारला तेव्हा तो जगाच्या पाठीवरील सर्वांत जास्त सदाचारी, न्यायी, सत्यनिष्ठ, स्नेही, परोपकारी, नैतिक, सभ्य, दयाळू, क्षमाशील, त्यागी, जनसुधारक, ज्ञानी, संशोधक, सहिष्णु समाज असल्याची इतिहासाने नोंद घेतली. या समाजाने मानवता आणि मानवी मूल्यांची; तसेच न्याय व सत्याची बहुमोल देणगी समस्त जगाला प्रदान केली. ही संपूर्ण क्रांती विशुद्ध एकेश्वरत्व व प्रेषित्वासह जुळलेल्या 'परलोकत्व' याच धारणेची मूळ देणगी व अनुग्रह आहे.

तुम्हाला वाटत नाही काय की आपण चांगले माणूस व्हावे? चांगला परिवार आणि चांगला समाज घडविण्याची तुमची इच्छा नाही काय? तुम्हाला नाही वाटत काय की दुराचार, अन्याय, अत्याचार, भ्रष्टाचार, अशांती, उपद्रव, स्त्रीवध, स्त्री-भ्रूणहत्या आणि अपराधी मानसिकतेचा या जगातून समूळ नायनाट व्हावा? तर आम्हाला मनापासून वाटते की तुमचे अंत:करण होकारार्थीच उत्तर देत आहे. तर यासाठी मृत्यूपश्चात जीवनाची इस्लामी धारणा किंचितही वेळ वाया न घालवता स्वीकारून आजपासूनच परलोकी जीवन यशस्वी करण्याच्या तयारीला लागू या. ईश्वर आपल्याला मार्गदर्शन आणि सहकार्य करो, हीच ईशदरबारी कळकळीची प्रार्थना आहे! (तथास्तु)

**- ० - समाप्त - ० -**